# वधूपरीक्षा.

हें नाटक

श्रीपाद कृष्ण कोल्हटकर,

बी. ए., एलएल. बी.

संगीत वीरतनय, मूकनायक, गुप्तमंजूष, मतिविकार, प्रेमशोधन

या नाटकांचे,

आणि

सुदाम्याचे पोहे व भारतीय ज्योतिर्गणित

या पुस्तकांचे कर्ते

यांनीं लिहिलें.



जुलै १९१४.

**Price Rs. 3-0-0**

## समर्पण.

ज्यांनीं आजपर्यंत योग्य सूचनांनीं व सहानुभूतिपूर्वक उत्तेजनानें
माझ्या अनेक कृतींस बहुमोल साहाय्य करून
माझा वाङ्मयांतील मार्ग सुगम केला,
व मला उपकारबद्ध करून ठेविलें,
ते माझे विद्वान्, मार्मिक व रसिक मित्र

**रा. रा. रामचंद्र भास्कर उर्फ भाऊसाहेब जयवंत**

यांस

हें पुस्तक अत्यंत आदरानें अर्पण केलें आहे.

**श्रीपाद कृष्ण कोल्हटकर.**

# प्रस्तावना.

हें नाटक १९१३ च्या नाताळांत लिहिलें. त्यानंतर एकदोन महिन्यांतच 'भारत' व 'महाराष्ट्र' या दोन नाटकमंडळ्यांनीं याचे प्रयोग सुरू केले. हें नाटक माझें पहिलेंच गद्यात्मक नाटक असल्यामुळें तें लोकांनां कितपत रुचतें, याची मला शंकाच होती. परंतु त्याच्या प्रयोगांकडे रसिकांनीं आजपर्यंत जी कृपादृष्टि ठेविली आहे, तिजवरून माझ्या इतर कृतींप्रमाणें ही कृतिहि ते गोड करून घेतील, अशी आशा वाटून ती प्रसिद्ध करण्यास उत्तेजन येत आहे.

ललित वाङ्मयाच्या इतर भेदांप्रमाणें नाटकाचाहि मुख्य उद्देश मनोरंजन हाच असतो; व यामुळें त्याची दृष्टि तत्त्वांपेक्षां त्यांच्या आविष्करणाच्या रूपाकडेच विशेष असते. पण ज्याप्रमाणें गणितासारख्या गंभीर विषयांवरील वाङ्मयाचें मुख्य ध्येय तत्त्वनिरूपण हें असतांहि त्यापासून कधीं कधीं आनंदहि प्राप्त होतो, त्याप्रमाणें नाटकाच्या द्वारें करमणुकीबरोबर बोधहि करून देतां येतो. शाकुंतल नाटकांत कण्वमुखानें शकुंतलेला केलेला उपदेश, हें या प्रकारच्या आनंदाविसंवादी बोधाचें उत्तम उदाहरण होय. जोंपर्यंत हें बोधात्मक गौण अंग मुख्य अंगाच्या आड येत नाहीं, तोंपर्यंत तें आक्षेपार्ह होत नाहीं. पण तें अंग भट्टीकाव्यांतील व्याकरणनियमांच्या स्पष्टीकरणाप्रमाणें मुख्य अंगास डोईजड होऊं लागलें, ह्मणजे त्याची छाटाछाट करणें हें नाटककाराचें कर्तव्य असतें.

माझ्या संगीत नाटकांतल्याप्रमाणें याहि नाटकांत कांहीं तत्त्वांचें मंडन करण्याचा प्रयत्न केला आहे. अनुलोम विवाह हा याचा मुख्य विषय असून त्याच्या अनुरोधानें बालविवाह, विषमविवाह, जातिभेद यांचाहि विचार यांत आला आहे. यांतील नायिका शूद्रकन्या असावी असा प्रथम संशय येऊन अखेरीस ती ब्राह्मणकन्या ठरत आहे, व या रीतीनें ब्राह्मणशूद्रीविवाह न घडून येतां ब्राह्मणब्राह्मणीविवाहच घडून येत

आहे. हा या नाटकांत एक दोषच आहे, असें कित्येकांनां वाटण्याचा संभव आहे. परंतु या नाटकाच्या अंतीं भिन्नजातीय वधूवरांचा विवाह घडवून न आणण्याचें कारण, तसें केल्यानें कलेच्या दृष्टीनें बरीच हानि होईल असें माझ्या अल्पबुद्धीस वाटलें, हें होय. आधुनिक सुधारणेचा कटाक्ष विसदृश वस्तूंच्या योगावर आहे; व आजपर्यंत घडत आलेल्या अन्यायांचा विचार करितां, तो योग्यच आहे हें कबूल केलें पाहिजे. उलट पक्षीं कलेचा कटाक्ष सदृश वस्तूंच्या योगावरच विशेषेंकरून असतो; व या नाटकांत भिन्नजातीयांचा विवाह घडवून आणिला असता, तर कलेच्या या दृष्टीस बाध आल्यावांचून राहिला नसता. शिवाय त्यापासून विश्वेश्वरशास्त्र्यासारख्या नायिकेच्या पक्षपात्यांस उद्वेग, व वाराणशी-सारख्या तिच्या प्रतिपक्षीयांस विजयानंद वाटला असता; व असें होणें नाटकाच्या दृष्टीनें मुळींच इष्ट नव्हतें. असो. नायिकेसारख्या सद्गुणसंपन्न बालेस केवळ ती हीनजातीय आहे ह्मणूनच उच्चवर्गीयानें परिग्रहणयोग्य न मानणें अन्याय्य आहे, येवढा जरी ग्रह या नाटकाच्या अवलोकनानें तटस्थाच्या मनावर झाला, तरी त्याचें सार्थक झाल्यासारखें मला वाटेल.

प्रयोगाच्या सोईकरितां नाटकांतील पहिले दोन प्रवेश मागाहून घातले आहेत. यामुळें नाटक कांहींसें मोठें झालें आहे. पहिल्या अंकांतील दुसरा व तिसरा प्रवेश गाळल्यास प्रयोग कमी कालांत होऊन नाटकाची विशेष हानिहि होणार नाहीं.

या नाटकांत शूद्रांचा संबंध आलेला असल्यामुळें कांहीं पात्रांची भाषा कुणबीच वापरावी लागली आहे. नाटक प्रथम लिहिलें तेव्हां कुणबी ह्मणून जी भाषा वापरण्यांत आली होती, ती कांहींशीं वऱ्हाडी व कांहींशी मालवणी वळणावर गेली होती. याप्रमाणें पडलेल्या अशुद्ध कुणबाऊ भाषेस अधिक शुद्ध (अथवा अधिक अशुद्ध ह्मटल्यास शोभेल.) करण्याच्या कामीं रा. रा. नरसिंह चिंतामण केळकर व रा. रा. रघुनाथ कृष्ण पिंपळखरे यांनीं मला फार मदत केली, सबब मी त्यांचा अत्यंत

ऋणी आहें. नाटकाच्या संविधानकासंबंधानें रा. रा. धुंडिराज रंगनाथ शेंबेकर, रा. रा. रामराव गणेश गडकरी व रा. रा. पुरुषोत्तम रामचंद्र लेले यांनीं अत्यंत उपयुक्त सूचना केल्या, याबद्दल त्यांचेहि उपकार मानणें अवश्य आहे.

महाराष्ट्र व भारत नाटकमंडळ्यांचे मालक रा. रा. त्र्यंबक सीताराम कारखानीस व रा. रा. यशवंत नारायण टिपनीस यांनीं हें नाटक प्रयोगरूपानें चांगल्या रीतीनें लोकांपुढें आणिलें, इतकेंच नाहीं, तर नाटकासंबंधानें यांनीं अनेक योग्य सूचनाहि केल्या, व रा. रा. यशवंत नारायण टिपनीस यांनीं व भारत नाटकमंडळीच्या रा. रा. पोतनीस, रा. रा. प्रधान इत्यादि इतर नटांनीं स्वतःचीं छायाचित्रें काढून घेण्याची परवानगी दिली, याबद्दल त्या सर्व गृहस्थांचे आभार मानावे तितके थोडेच आहेत.

मनोरंजनाचे सहकारी संपादक रा. रा. विठ्ठल सीताराम गुर्जर यांनीं नाटकासंबंधानें अनेक महत्त्वाच्या सूचना करून शिवाय पुस्तक छापतांना मला जें बिनमोल साहाय्य केलें, त्याचाहि येथें कृतज्ञतापूर्वक निर्देश केला पाहिजे. शेवटीं, कर्त्यांच्या सर्वांत लहान व म्हणून आवडत्या अशा या अपत्यास अत्यंत सुंदर व ठाकठिकीचा वेष देऊन केवळ दहाबारा दिवसांच्या अवधींत रसिकांपुढें आणितांना मनोरंजन छापखान्याचे मनमिळाऊ व उत्साही मालक रा. रा. काशीनाथ रघुनाथ मित्र यांनीं जें सौजन्य व जी तत्परता दाखविली,त्यांबद्दल त्यांचे मनःपूर्वक आभार मानून ही प्रस्तावना संपवितों.

मुंबई,
तारीख १९ जून १९१४. } श्रीपाद कृष्ण कोल्हटकर.

# वधूपरीक्षा.

## अंक पहिला.

### प्रवेश पहिला.

[ राणी, धुरंधर व भार्गव. ]

**राणी**—बाळासाहेब, तुह्मीं विलायतेपासून आपल्या बंदरापर्यंतचा प्रवास आपला इतमाम बाजूला ठेवून सामान्य माणसाप्रमाणें केलात, यावरून तुमचा विचार काय समजावयाचा ? प्रथम आपली वधू स्वतःच पसंत करायची, आणि नंतर प्रजाजनांना खऱ्या रूपानें दर्शन द्यायचें, असाच ना ? पण मी ह्मणतें, तुह्मी पुन्हा एकवार या गोष्टीचा विचार करा, आणि हें वधू निवडण्याचें काम मजवर न सोंपवितां स्वतःच केलें पाहिजे कीं काय तें सांगा.

**धुरंधर**—आईसाहेब, पाहिजे आणि नको हें आपणापुढें मी कोण ठरविणार ? आपण मला जन्म दिलात, बालपणापासून माझ्या शारीरिक व मानसिक पोषणाची काळजी बाळगिलीत, माझ्या मनापुढें उच्च ध्येय ठेवून त्याला नीट वळण लाविलें, आणि माझें शिक्षण सर्वांगसुंदर व्हावें ह्मणून माझा वियोग सहन करण्यासहि तयार झालांत. आटोकाट धोरण व अप्रतिम पुत्रवात्सल्य यांच्या साहाय्यानें आपण माझें गत चरित्र जसें

ठरविलेंत तसें भावि चरित्र ठरविण्याचाहि आपणाला अधिकार आ
फार काय, पण आपण लग्नावांचूनच रहाण्याची जरी मला आज्ञा के
तरी ती मी आनंदानें पाळीन. अशा प्रेमळ मातु:श्रीच्या कृपाछत्राखा
निर्भयपणें जन्म घालविण्याचें भाग्य असल्यावर आणखी काय पाहिजे

**राणी**—बाळासाहेब,प्रत्येकाच्या अधिकारास मर्यादा असते,त्याप्रम
ती आईच्या अधिकारासहि असते. तुह्माला स्वतंत्रपणानें अधिकार चा
विण्याची योग्यता पूर्णपणें प्राप्त झाली आहे. अशा वेळीं तुमच्या ह
अधिकारसूत्रें दिलीं नाहींत तर तुमच्या कर्तृत्वाची वाढ तरी कशी होण
गरुडपक्ष्याचें पोर पंख पसरून आकाशाचा ठाव पहाण्यास उद्युक्त झ
असतां त्याच्या मातेनें आपल्या बाहुपाशानें त्याच्या गतीला प्रति
करणें कधींहि योग्य होणार नाहीं. मात्र तुह्माला उच्छृंखलपणें वाग
येऊं नये याकरितां तुमच्या पायांत स्त्रीरूपी नाजूक शृंखला वेळ
अडकविली पाहिजे.

**धुरंधर**—सारें त्रिभुवन शोधिलें तरी बुद्धीनें व प्रेमानें तुह्माला
शोभण्याजोगी एकतरी स्त्री सांपडेल का ? मी सुमार्गानें चाललों अस
आपल्या कृपाकटाक्षानें उत्तेजन देणारी व मी उन्मार्गगामी होऊं लाग
असतां मला प्रेमरज्जूनें आवरणारी स्त्री कोठें मिळणार? आईसा
अशी स्त्री शोधून काढणें आपल्यासारख्या तीक्ष्ण बुद्धीच्या मातेसहि श
नाहीं. मला मातृसुखच जन्मभर लाभो ह्मणजे झालें.

**राणी**—बाळासाहेब, मी तुमच्या जन्माला थोडीच पुरणार अ
तुमच्या प्रेमांत मला वांटेकरीण मिळावी, अशी माझी तरी इच्छा आहे
पण तुमच्या प्रेमाला यापुढेंहि एकच विषय राहिल्यास तो नाह
झाल्यावर तें प्रेम वाटेल त्या स्त्रीच्या दृष्टिलहरीबरोबर इतस्तत: सं
करावयाचें. तसें होऊं नये ह्मणून वेळींच मोह आवरून मला तुम
हातीं अधिकार देतांना तुमच्या प्रेमावरील अर्धा हक्कहि माझ्या सुने
स्वाधीन केला पाहिजे. आतां ही सून मीं निवडायची किंवा तुह्मीं, एव

ा पहिला.

बाळासाहेब, तुमच्या वडिलांकारितां माझी निवड
त्र केली. असें असूनहि तुमच्या वडिलांना त्याबद्दल
ां कारण मिळालें नाहीं.

ाहेब, आपलें बोलणें अगदीं सयुक्तिक आहे. आपली
ा; पण माझ्यासारखा यःकश्चित् मनुष्यहि महाराजांना
ा देईल.

ाहेब, आपण अपवादरूप आहांत. आपला दाखला
? बाबा व आजोबा यांपैकीं कोणींहि निवड केली
त्रे राज्यांत उत्कृष्ट गुणांनीं नाणावलेल्या आपल्या-
च झाली असती. पण प्रत्येक ठिकाणीं हें कुठून
ा वधूनें वरावर अकृत्रिम प्रेम करावें, हाहि अघटित
ांत घडून आला तसा प्रत्येक विवाहांत घडून येईल
हीं. इतकेंच नाहीं, तर असा अपवादरूप योग एकदां
व तो पुन्हा घडणें असंभाव्य झालें आहे. आपणाला
ाहित असल्यामुळें कदाचित् आपली निवड माझ्याहि
ण हा असला संबंध वधूलाहि सर्वथैव पसंत पडेलच
नाहीं. एकांगी निवड व एकांगी प्रेम, असाच प्रकार
ाहांत दिसून येतो.

ो राणी झाल्यावर कोणत्याहि स्त्रीचें आपल्या पतीवर
कठिण नाहीं.

मग तें प्रेम पतीवर बसलें असें कसें ह्मणतां येईल?
असें ह्मणावें पाहिजे तर!

ांना पसंत असा संबंध स्वतःच जुळवून आणण्याचा
च दिसतो. तेव्हां त्याविषयीं वाद घालून तुमचा
वें कारण नाहीं. तथापि वडील माणसांप्रमाणें तरु-

णांचीहि अशा नाजूक गोष्टींत चूक होण्याचा संभव आहे, हें लक्ष्यांत असूं द्या.

**धुरंधर**—आपल्या आशीर्वादानें चूक होणार नाहीं, अशी मी उमेद बाळगतों. जर झालीच,तर हें राज्याचें गाडें हाकण्यालाहि मी योग्य नाहीं असें सिद्ध होईल. जो राजा अल्लड तरुणीचें अंतरंग पारखूं शकत नाहीं त्याला प्रजेच्या विविध अंतरंगांची काय पारख असणार? आई-साहेब, आपल्या शिरावरून राज्याधिकाराचा बोजा स्वतःच्या शिरावर घेण्याचें माझें जसें कर्तव्य आहे, तसें मजकरितां वधू निवडण्याच्या जबाबदारींतून आपणाला मोकळें करणें हें नाहीं का?

**राणी**—बाळासाहेब, तुमच्या प्रेमाच्या हट्टापुढें मला आपला आग्रह सोडणें भाग आहे. देव तुह्माला या कामीं पूर्ण यश देवो, आणि तुमच्या मार्गांत कांहीं विघ्नें न येऊं देतां मला लवकरच भेटवो! बरोबर भार्ग-वाला घेऊन जा. भार्गवा, माझ्या बाळासाहेबांच्या प्राणांची तुझ्याकडे ठेव ह्मणून ठेविली आहे. ती मला जशीच्या तशीच परत आणून दिली पाहिजे.

**भार्गव**—बाळासाहेबांनीं आपला हा हट्ट सोडून दिला असता तर आपणाप्रमाणें मलाहि संतोष झाला असता. पण ज्याअर्थीं ते हें काम शिरावर घेत आहेत, त्याअर्थीं डोळ्यांत तेल घालून त्यांच्या कुशलाची काळजी करणें हें माझें कर्तव्य आहे.

**धुरंधर**—आईसाहेब, आपण माझे कोड पुरविण्याकरितां स्वतःची आवडहि बाजूला ठेविली, हे आपले उपकार मी कधीं विसरणार नाहीं.

**राणी**—बाळासाहेब, मी तुमच्या बेताला मान्यता दिली खरी; पण आईचें हृदय माझ्या मनांत नसत्या शंका उत्पन्न करीत आहे. तुमचें खरें स्वरूप जर का उघडकीला आलें, तर तुमचा बेत फसून कदाचित् प्राणांवरहि संकट यायचें. याची कांहीं खबरदारी घेण्याचा तुमचा विचार असेलच?



**धुरंधर**—जो राजा अल्लड तरुणीचें अंतरंग पारखूं शकत नाहीं त्याला प्रजेच्या विविध अंतरंगांची काय पारख असणार ? [ पृष्ठ १२. ]

**धुरंधर**—आईसाहेब, त्याचाहि बंदोबस्त करण्याची मीं अल्प मतीनें एक योजना ठरविली आहे. गेल्या बारा वर्षांत प्रजेपैकीं एकानेंहि मला पाहिलें नाहीं. चित्रावरून ओळखतील ह्मणावें, तर येथून निघण्यापूर्वी मी या दाढीला कायमची रजा देणार. नाटकांत कृत्रिम दाढी लाविल्यानें जर मनुष्य निराळा भासूं लागतो तर व्यवहारांत दाढी काढूनहि कां भासूं नये? याच्या जोडीला आपण जर चोहोंकडे असें जाहीर केलें, कीं एक तोतया माझी गादी स्वतःच्या सदृश रूपाच्या साहाय्यानें हिरावणार आहे अशी बातमी आल्यामुळें मला तूर्त विश्वासुक रक्षकांच्या पहाऱ्यांत बंदोबस्तानें ठेविलें आहे व मला भेटण्याची कोणालाहि परवानगी नाहीं, तर मला कोणींहि ओळखण्याची भीति दिसत नाहीं.

**राणी**—आणि वेष कोणता घेणार?

**धुरंधर**—ज्योतिष्याच्या वेषांत मनुष्यस्वभाव अविकृत स्थितींत दिसण्याचा बराच संभव असल्यामुळें तोच वेष घेतलेला बरा. सोंगाची नीट बतावणी करितां यावी ह्मणून मीं प्रवासांत ज्योतिषाचें ज्ञानहि संपादन केलें आहे.

**राणी**—वाः, तुह्मीं अगदीं येथपर्यंत सुद्धां तयारी करून ठेविली आहेत ना? शाबास तुमची! पण इतक्या सगळ्या युक्त्या करूनहि तुह्माला आपल्या वधूची निवड माझ्या साहाय्यावांचून करितां येईल असें वाटत असेल, तर ती तुमची चूक आहे. कारण वधूसमुद्रांतून अत्यंत उज्ज्वल रत्न शोधून काढणें हें कांहीं सोपें काम नाहीं. ह्मणून आपल्या राजधानीच्या मुलींपैकीं [illegible]
हें मला तुह्माला सुचवून ठेविलें [illegible]
ह्मणजे रुकाराचें क्षेत्र आपोआपच [illegible]
अनुभवाला माझ्या अनुभवाची जोड मिळून तुमचे वृथाश्रम वांचतील. निवडीचें क्षेत्र जितकें आकुंचित तितकी तुह्माला निवड सोपी जाईल.

**धुरंधर**—अशा कामीं आपला अनुभव मला ध्रुवाप्रमाणें मार्गदर्शक होईल.

**राणी**—ऐका तर. आपल्या शहरांत विश्वेश्वरशास्त्री नांवाच्या एका घरंदाज गृहस्थाची गंगू नांवाची सुरेख व गुणी मुलगी आहे. तशीच तिची मैत्रीण यमुना ही देखील वाखाणण्यासारखी आहे. या दोघी नापसंत पडल्या तरच तुह्मीं दुसरीकडे ठरविण्याचें माझ्यापाशीं कबूल केलें पाहिजे.

**धुरंधर**—वा:, वडिलांना मान्य अशीच निवड करण्याची संधि आली असतां ती वाया कोण दवडील ? आईसाहेब, मी गंगूची पारख करण्याकारितां विश्वेश्वरशास्त्र्यांच्या घरीं ज्योतिष्याच्या वेषानें राहीन; आणि भार्गवाला यमुनेच्या घरीं दुसऱ्या कोणत्या तरी वेषानें ठेवीन. मग तर झालें ना ?

**राणी**—असो; आपणाला अजून बऱ्याच किरकोळ गोष्टी ठरवायच्या आहेत, त्या स्वस्थपणानें ठरविल्या पाहिजेत.

[ राणी व धुरंधर जातात.

**भार्गव**—( स्वत:शीं ) हा भार्गव स्वयंवराचा इतका पक्षपाती व अंधविवाहाचा इतका द्वेष्टा ! धुरंधरमहाराजांच्या वधूपरीक्षणाच्या बेतास त्याचा इतका पाठिंबा ! बाबांच्या मरणानंतर पोरका झालेल्या या मुलाच्या पालनपोषणाची जबाबदारी संस्थानाकडे आल्यावर त्याला राणीसाहेबांनीं स्वत:च्या मुलाप्रमाणें व धुरंधरमहाराजांनीं आपल्या बंधूप्रमाणें वागवून जे डोंगरासारखे उपकार केले ते यथाशक्ति फेडण्याचा त्याचा इतका निश्चय ! परंतु काल हिंदुस्थानच्या भूमीवर पाय ठेवितांच राणीसाहेबांनीं बाबांचें जें हें मृत्युपत्र माझ्या स्वाधीन केलें त्यानें त्या सगळ्यावर क्षणांत विरजण पाडिलें. ‘ माझा मुलगा वयांत आल्यावर हें पाकीट त्याच्या स्वाधीन करावें.’ हें त्यावरील वाक्य वाचतांच माझ्या पोटांत धस्स झालें. पण आंतील मजकुरानें तर माझी सगळी

उमेद खचून गेली. कालपासून या मृत्युपत्राचीं कितीदां तरी पारायणें केलीं असतील. पण ज्याप्रमाणें चुकलेलें वत्स धेनूकडे धांवत जातें त्याप्रमाणें फुरसद मिळाली कीं माझे डोळे या मृत्युपत्राकडे धांव घेऊं लागतात. यांतील एकूणएक अक्षर मला मुखोद्गत झालें आहे. यांतील शब्द एकसारखे माझ्या कानांत गंभीर नाद करीत आहेत. यांतील आशयानें माझ्या अंतःकरणावर कायमचा ठसा उमटविला आहे. परंतु यावरून नेत्र फिरविण्याची माझी तहान अजून शांत होत नाहीं. (वाचतो)—'मुला, हें मृत्युपत्र जेव्हां तुझ्या दृष्टीला पडेल, त्याच्या सत्रा वर्षांपूर्वीं विजयादशमीच्या दिवशीं आपल्या घरीं एक अनोळखी गृहस्थ येऊन त्यानें आपली सोन्यासारखी मुलगी व तिच्या खर्चाकरितां सोन्यानें भरलेली एक पिशवी माझ्या स्वाधीन ठेव ह्मणून ठेविली. त्याच दिवशीं दुसरा एक नवखा गृहस्थ आपल्या घरीं पांथस्थ ह्मणून बिऱ्हाडाला आला. हें पाहून मीं दुष्टानें द्रव्याच्या अभिलाषानें व ठेव ठेवणारा लवकर परत येईल या भीतीनें त्या पांथस्थाच्या भिस्तीवर त्याच रात्रीं त्या मुलीला टाकून कुटुंबासह देशांतर केलें. सुदैवानें त्या मुलीच्या गळ्यांतील जस्ती ताईत कवडीमोलाचा ह्मणून तसाच राहूं देण्याची मला बुद्धि झाली. असो; मीं दुरात्म्यानें या रीतीनें सोनें लुटून व सीमोल्लंघन करून विजयादशमीचा सण पार पाडला ! परंतु न्यायनिष्ठुर दैव कृतकर्माबद्दल प्रायश्चित्त देण्याकरितां परमुलखांत सुद्धां आपल्यामागें धांवत आलें, आणि त्यानें एकामागून एक तुझ्या साऱ्या भावांचे बळी घेतले. अखेरीस तुझी आईहि त्याच तापाच्या सांथींत मरण पावली, व मीं अन्यायानें गिळंकृत केलेलें धनहि चोरीस गेलें. ईश्वराच्या न्यायदेवतेनें माझ्या सभोंवतालचीं आप्तांचीं कवचें नाहींशीं करून अंतीं मला स्वतःला गांठिलें आहे. हें मृत्युपत्र मी निर्वाणींच्या काळीं लिहीत आहें. वर लिहिलेली हकीकत कदाचित् अजूनहि तुझ्या स्मरणांत असेल. बाळा, ज्या मुलीला मीं तिच्या पित्या-पासून एका हातानें घेऊन दुसऱ्या हातानें तिसऱ्याच्या स्वाधीन करून

त्रिस्थळीं यात्रा घडविली, त्या मुलीला तुझी धाकटी बहीण समजून तिचा त्या जस्ती ताइताच्या धोरणानें शोध करून तूं तिला शक्य तितक्या वैभवास चढवावें, ही माझी अखेरची इच्छा आहे. ती पार पाडण्यासाठींच देवानें तुला वांचविलें आहे अशी माझी मनोदेवता वाहते. जर ती खरी ठरून तूं माझी इच्छा पूर्ण केलीस तर माझ्या अक्षम्य अपराधांचीहि ईश्वराकडून क्षमा होण्याची मला आशा आहे. जर माझी ही इच्छा सफळ न होतां तशीच राहिली तर तुझ्या पित्यास अनंत काळपर्यंत नरकयातना भोगीत रहावें लागेल. ईश्वर तुला दीर्घायुष्य व सद्बुद्धि देवो !' बाबा, संसाराच्या उंबरठ्यांत मीं मोठ्या उमेदीनें पाऊल टाकिलें न टाकिलें तोंच माझ्या शिरावर हा जबाबदारीचा केवढा तरी डोंगर आपण टाकीत आहांत ! तप्त सुवर्णावर उमटवलेल्या मुद्रेप्रमाणें आपण लिहिलेल्या या सर्व गोष्टी माझ्या तापलेल्या स्मृतीवर लहानपणींच पूर्णपणें उमटलेल्या होत्या. त्यांजवर कालाची धूळ सांचून त्या कांहींशा अस्पष्ट होतात, तोंच आपल्या या मृत्युपत्रानें ती धूळ उडवून त्या पूर्ववत् उज्ज्वल केल्या आहेत. एकीकडून माझ्या ताईची सुंदर व केंविलवाणी मुद्रा दिसत आहे, व दुसरीकडून आपली अनुतप्त मुद्रा दिसत आहे. बाबा, धुरंधरमहाराजांच्या वधूपरीक्षणाचे कामीं साहाय्य करणें हें जर माझें मुख्य कर्तव्य असलें,तर आपली आज्ञापाळणें हें माझें आद्य कर्तव्य आहे.सुदैवानें मीं धुरंधरमहाराजांचा इतका विश्वास संपादन केला आहे कीं, मीं शब्द खर्च केला तर ते माझ्या ताईला या संस्थानाची मालकीण करण्यालाहि तयार होतील. माझी ताई इतकी सुंदर आहे कीं, या द्विविध कर्तव्यांत विरोध येण्याचेंहि कांहीं कारण नाहीं. त्यांच्याकारितां मीं नेमस्त केलेली वधू त्यांच्याहि पसंतीस उतरेल अशीच आहे.बाबांनीं प्रथम तिचा शोध करून नंतर तिचें कल्याण करण्याची आज्ञा केली आहे. पण येथें तर तिच्या कल्याणाची प्रथम सिद्धता होऊन तिचा शोध मात्र लागावयाचा राहिला आहे. तिचें पुनर्दर्शन झालें तरच या सर्वांचा उपयोग. नाहींतर माझे सारे बेत जागच्या जागींच जिरून जातील. या मृत्युपत्रांतील

मजकूर महाराजांना सांगून त्यांना कांहीं दिवस थोपवून धरूं का? छेः, पण तें मुळींच इष्ट नाहीं. गुप्त वेषानें वधू पहाण्याची महाराजांना राज्यारोहणापूर्वींच जशी संधि मिळणार आहे तशी फिरून मिळणार नाहीं. ही संधि त्यांनीं दवडून बसावें इतकी मला ताई सांपडण्याची आशा आहे का? मुळींच नाहीं. कदाचित् ती यापूर्वींच परलोकीं गेली असेल. शिवाय बाबांच्या दुष्कृत्यांचा हा पाढा तरी मी कोणत्या तोंडानें त्यांना वाचून दाखवूं? तें कांहीं नाहीं. मला स्वतःच्या हिंमतीवर भिस्त ठेवूनच गुप्तपणें माझें शोधाचें काम चालू ठेविलें पाहिजे.

[ जातो.

---

## प्रवेश दुसरा.

[ पार्थिव, अमला, कमला व तारा. ]

**पार्थिव**—अरे वा! बरी गांठ पडली आमच्या शेजारणींची! इतक्या घाईनें कुणीकडे?

**अमला**—आह्मांला देवदर्शन करायला जायचें आहे.

**पार्थिव**—कमले, तारे, तुह्मांलाहि देवदर्शनच करायचें आहे का?

**कमला व तारा**—होय.

**पार्थिव**—आज इतकीं वर्षें तुमची देवावरील भक्ति गाढ झोंप घेत होती; ती अलीकडे खडबडून जागी झाल्यासारखी दिसते!

**कमला**—मग त्यांत काय झालें येवढें मोठेंसें? पोटांत दुखलें तर कोणीहि वैद्याचें घर पहातो!

**पार्थिव**—वैद्यापुढें मांडायला तुह्मीं बरोबर कांहीं तरी घेतलेंच असेल.

**अमला** —मीं हे तांदूळ घेतले आहेत; आणि या दोघी बहिणींनींहि एकेक पैसा आणिला आहे.

**पार्थिव**—या तांदुळाच्या आणि या पैशाच्या मोबदल्यांत तुह्मी देवाजवळ असें मागणार तरी काय?

**अमला**—काय ह्मणजे? दुसऱ्या मुली मागणार तेंच आह्मी मागणार.

**पार्थिव**—आणि कमळे, तारे, तुह्मी ग?

**कमला**—आह्मी तरी काय जगावेगळ्या आहों दुसरेंतिसरें मागायला?

**पार्थिव**—आणि ही चिमुरडी तारा सुद्धां तेंच मागणार वाटतें?

**तारा**—मी नाहीं जा चिमुरडी! बाबा कडेवर घेतात तेव्हां मी मोठी दिसत नाहीं वाटतें?

**पार्थिव**—आणि आपल्या घराच्या अगदीं वरच्या मजल्यावर उभी रहातेस तेव्हां किती मोठी दिसतेस ह्मणून सांगूं? तुमच्यासारख्या मोठ्या मुलींना एकच उत्तम वर देवाला मागण्यासारखा असतो; आणि तोहि उत्तम वर हाच, होय ना? (सर्वजणी लाजून खालीं पहातात.) देवानें उत्तम वर मागा असें ह्मटल्यावर तुमच्यासारख्या लाजाळू पोरींनीं निराळ्या शब्दांनीं उत्तर देण्याची जरूरच नाहीं. पण हा वर मिळण्याकरितां देवळांचे उंबरठे झिजविण्याची तरी काय जरूर? आह्मांसारखे नवरदेव जर तुमच्यापुढें लोटांगणें घालायला तयार आहेत तर या देवांना लोटांगणें घालून वृथा आयास कशाला करितां?

**तारा**—आह्मांला असा साधा नवरदेव नको आहे.

**पार्थिव**—कोणाला वाटेल कीं तुह्मी साऱ्याजणी हातांत आरत्या घेऊन धुरंधरमहाराजांचीच वाट पहात आहांत.

**अमला**—आतां मात्र ओळखिलेंत खरें.

**पार्थिव**—काय ह्मणतां? मूठभर तांदुळाकरितां आणि पैसाभर तांब्याकरितां देवानें तुह्मांला या राज्यांतील सारी जमीन आणि सारें द्रव्य बहाल करावें, असें तुमचें ह्मणणें?

**कमला**—सुदाम्याच्या पोह्यांबद्दल सोन्याची नगरी ज्यानें दिली त्याला तें जड का जाणार आहे?

**पार्थिव**—त्याला जड नाहीं गेलें ह्मणून मागणारानें आपल्या योग्यतेचाहि कांहीं विचार करायला नको का? देवाच्या कनवाळूपणाची कीर्ति रहावी ह्मणून बिचाऱ्या धुरंधरमहाराजांनीं हीं असलीं ध्यानें आपल्या गळ्यांत जन्मभर वागवावीं कीं काय? कमले, हें तुझें बसकें नाक तुझ्या लीनपणाचें चिन्ह ह्मणून त्या प्रणतवत्सलास आवडेल कदाचित्; पण महाराजांना नाहीं हो आवडायचें! तसेंच अमले, तुझी ही तिरळी दृष्टि तुझ्या एकाग्र भक्तीची खूण ह्मणून त्या अनन्य-गतिशरणास एकवार पसंत पडेल; पण महाराजांना पसंत पडेल असें मात्र समजूं नकोस हो!

**कमला**—महाराजांची दृष्टि अशी कोती नाहीं कांहीं. त्यांना आंतील गुणांची पारख चांगली आहे.

**पार्थिव**—त्यांची दृष्टि तूं ह्मणतेस तशी अंतर्भेदी असेलहि कदाचित्. पण हे चेहऱ्यावरील रखवालदार त्या दृष्टीचा आंत प्रवेश होऊं देतील, तेव्हां तिनें पारख करायची कीं अगोदरच?

**अमला**—प्रेम अंधळें असतें ह्मणतातना?

**पार्थिव**—त्या अंधळेपणावर तुमची सारी मदार आहे ह्मणतां? पण प्रेमाला हें जें अंधळेपण येत असतें तें उज्ज्वल सौंदर्य पाहूनच येत असतें. आणि तें आंतर व्यंगांपुरतेंच असतें. बाह्य रूपासंबंधानें नसतें. आधीं अंधळेपण आणि नंतर प्रेम असा त्यांचा क्रम नसून प्रथम प्रेम आणि नंतर अंधळेपण असा असतो.

**कमला**—आह्मीं ज्योतिष्याला आपल्या पत्रिका दाखविल्या; त्यानें सांगितलें कीं ग्रहांची शांति केली तर मनाप्रमाणें वर मिळेल.

**पार्थिव**—ग्रह शांत करा किंवा नका करूं. महाराजांचे डोळे मात्र शांत करा, ह्मणजे त्यांत सगळें कांहीं आलें. तुमचें त्यांजवर खरें प्रेम असेल आणि त्यांच्या खऱ्या सुखाची तुह्मांला काळजी असेल तर

त्यांजवर तुह्मीं जुलमाची वधू लादूं नये हेंच बरें. अमले, तुझी भक्ति महाराजांवर अधिक का देवावर ?

**अमला**—अर्थात् देवावर.

**पार्थिव**—मग महाराज तुला कधींच पसंत करणार नाहींत. पति हेंच स्त्रीनें आपलें दैवत समजलें पाहिजे. कमळे, तुझी भक्तिग ?

**कमला**—माझी महाराजांवरच अधिक आहे.

**पार्थिव**—तर मग देवाला राग येऊन तो तुला राणी करणारच नाहीं. बरें अमले, तूं राणी होऊन करणार तरी काय ?

**अमला**—मी अंगावर रत्नांचे दागिने घालून सर्व नगरभर हत्तीवरून मिरवत जाईन.

**पार्थिव**—आणि तूं ग कमले ?

**कमला**—मी सर्व दरबारी आणि मानकरी लोकांकडून पायां पडून घेईन.

**तारा**—आणि मी मोत्यांची बाहुली खेळायला मागून घेईन; आणि तिचें लग्न करायला संस्थानांतल्या सगळ्या मुली गोळा करीन.

**पार्थिव**—एकूण बाहुलीच्या लग्नाकारितां तूं आपलें लग्न करणार तर ? याला ह्मणावें स्वार्थत्याग ! नाहींतर या आपलपोट्या पहा ! बरें चला, मलाहि देवदर्शन घ्यायचें आहे.

[ जातात.

---

## प्रवेश तिसरा.

[ धुरंधर व भार्गव. ]

**धुरंधर**—भार्गवा, गेले चार दिवस रोज संध्याकाळीं मी विश्वेश्वर शास्त्र्यांच्या कुटुंबाबरोबर नेमानें या देवळापाशीं येतों आहें, तेव्हां कोठें आज तुझी गांठ पडली.

भार्गव—महाराज, आपणाप्रमाणें मीसुद्धां आपल्या भेटीची संधि
ळावी ह्मणून यमुनेबरोबर रोज सायंकाळीं येथें येत होतों. पण या
तींच्या विशाल समुदायांत एकमेकांची गांठ पडावी कुठून? भगवान्
चंद्राच्या दर्शनासाठीं उसळलेल्या या रमणीलहरींत आपल्या-
रख्या दोन क्षुद्र नौकांची चुकामुक पडावी यांत नवल तें काय?
त्रीलतांच्या कुंजांत दिशाभूल होऊन आपण नापत्ता झालों तरी
टा रुतण्याची भीति नाहीं हें एक तेवढ्यांतल्या तेवढ्यांत बरें आहे.
चीं कधीं तर या चक्रव्यूहांतून अचुक वाट सांपडण्यापेक्षां ती वाट
तिच्याबरोबर आपण स्वतःहि नापत्ता होणेंच अधिक सुखकर, असा
ना अनुभव आला. छे बोवा, इतक्या सुंदर तरुणी एकत्र जमलेल्या
जन्मांत पाहिल्या नव्हत्या. देवळासमोरील या विस्तीर्ण तळ्यांत
मळांची फार दाटी आहे ह्मणून आजपर्यंत कीर्ति होती. पण देवळां-
ल्ल या मुखकमलांच्या गर्दीपुढें तर तीं कमळेंहि विरळ भासूं लागलीं.
पल्या संस्थानांतील झाडून साऱ्या उपवर मुली या शहरांत गोळा
ल्या असल्या पाहिजेत! आणि कां नाहींत गोळा होणार? या संपन्न
स्थानाच्या गादीचा नुक्ताच वयांत आलेला मालक आपला परदेशींचा
भ्यासक्रम आटोपून राज्यसूत्रें हातीं घेण्याकरितां परत आला आहे,
त्याबरोबरच विवाहसूत्रानें बद्ध होण्याचाहि त्याचा विचार आहे,
ा क्षोभजनक वार्तेनें या संस्थानाचें मंथन झाल्यावर त्याचें संपूर्ण युवति-
रूप नवनीत एकत्र जमावें हें साहजिकच आहे. या साऱ्या भाबड्या
मुली संस्थानिक आपल्याच वांट्यास यावा ह्मणून बिचाऱ्या रोज देवास
वस करीत आहेत, व त्याचे उंबरठे झिजवीत आहेत. त्यांच्या आया
जचे रोज एकीकडे त्यांचीं मस्तकें परोपरीच्या अलंकारांनीं नटवीत
आहेत, व दुसरीकडे शंकराच्या मस्तकावर अभिषेकाचा मारा करीत
आहेत; एकीकडे मुलींच्या हातांत सुवर्णाचीं व रत्नांचीं कंकणें घालीत
आहेत, तर दुसरीकडे देवाच्या दलालांच्या मुठी सुवर्णानें व रत्नांनीं
भरीत आहेत; एकीकडे मुलींच्या भालप्रदेशावरील कुंकुमतिलक कोरण्यांत

प्रहरन्प्रहर घालवीत आहेत, व दुसरीकडे त्यांच्या भालीं काय लिहिलें आहे हें आपणांसारख्या एकाएकीं प्रसिद्ध झालेल्या ज्योतिष्याकडून वाचवीत आहेत. याप्रमाणें मानुष व दैवी उपायांचा अवलंब करितांना बिचाऱ्यांच्या ध्यानींमनींहि येत नसेल कीं, मुलींचें भविष्य बिनचुक सांगणारा हा जो ज्योतिषी आपणांसमोर दिसत आहे त्याच्या अंगीं त्यांचें भविष्य ठरविण्याचीहि शक्ति आहे; व केवळ दैवाच्या रेषा पहाण्याकरितां जो हात किंचित् काळपर्यंत आपण त्याच्या हातीं देत आहोंत तोच कायमचा दिल्यास मुलींच्या सुदैवाची परमावधि होईल.

धुरंधर—भार्गवा, या छद्मवेषानें या भोळ्या मुलींना फसवून मी महापातक करीत आहें, असें मला दिवसांतून कितीतरी वेळां वाटतें. पण तसें केल्यावांचून गत्यंतर नाहीं, असेंहि लागलींच वाटूं लागतें. स्वतःची वंचना करून घेऊन जन्माचें नुकसान करून घेण्यापेक्षां याप्रमाणें कांहीं दिवस परवंचना करून स्वतःचें जन्माचें कल्याण करणें हें कितीहि स्वार्थबुद्धीचें असलें तरी माझें स्वतःसंबंधाचें एक कर्तव्य आहे. मी विलायतेंत असतां आईसाहेबांनीं आटोकाट धोरणानें राजधानींतील अठरा वर्षांखालील मुलांमुलींकरितां सक्तीच्या ब्रह्मचर्याचा व शिक्षणाचा नियम करून तो अमलांतहि आणिला, त्याचीं गोड फळें आतां चोहोंकडे दिसत आहेत. केवळ शरीरानेंच नाहीं तर मनानें सुद्धां सुंदर, बांधेसूद व पूर्ण अशा मुली संस्थानांत शेंकड्यांनीं मोजितां येतील. आजपर्यंत स्त्रियांच्या आयुधागारांत नयनबाण, भ्रुकुटिभंग, सुहास्य हींच शस्त्रें असत; त्यांच्या जोडीला आतां उच्च विचार, सुसंस्कृत मन, उदार हृदय व गोड वर्तन हीं अस्त्रेंहि आलीं आहेत. त्या शस्त्रांपेक्षां या अस्त्रांची योग्यता सहस्रपटीनें अधिक; पण त्यांचें वास्तव्य हुडकून काढण्याचें कामहि तितकेंच दुर्घट असतें. तें निकट सहवासानें व सूक्ष्म अवलोकनानें मात्र साध्य असावयाचें. मी एकदां संस्थानिक ह्मणून जाहीर रीतीनें प्रकट झालों तर मला तशा सहवासाची व अव-

लोकनाची संधिच मिळणार नाहीं. ह्मणून तें काम मला त्यापूर्वीच उरकून घेतलें पाहिजे.

**भार्गव**—आपण इतरांना फसवीत आहांत त्यापेक्षां स्वत:ला अधिक फसवून घेत आहांत. आपणाला वाटतें कीं, आपण रूपापेक्षां गुणांकडेच लक्ष्य पुरवून निवड कराल. पण हा निव्वळ भ्रम आहे. तरुणाचें लक्ष्य नेहमीं सौंदर्याकडेच असावयाचें. एखाद्या बालेचा शुभ्रवर्ण पाहिला कीं, तिच्यांत सोज्ज्वळ गुणहि असावेसे त्याला भासूं लागतात; नाकाप्रमाणें वर्तनांतहि सरळपणा असावासा वाटूं लागतो; शरीरांतील समतोलपणा पाहून तो मानसिक स्थितींतहि समतोलपणा कल्पूं लागतो; विशाल नेत्रांवरून तो मनाच्या उदारपणाचीहि कल्पना बांधतो; आणि मधुर हास्यावरून गोड वर्तनाचें अनुमान करून तो मिटक्या मारूं लागतो. याप्रमाणें तो स्वत:ची फसवणूक करून घेऊन अखेरीस बाहेरून नितांत रमणीय पण आंतून अत्यंत भेसूर अशा स्त्रीची निवड करितो. आणि खरोखर बाह्य सौंदर्याबरोबर आंतर नीचपणा बहुधा ठेवलेलाच असावयाचा. पहाणारास जो यौवनाचा ताठा वाटतो तो वास्तविक स्फटिकतुल्य निर्मल शरीरांतून दिसणारा मनाचा ताठा असतो. डोळ्यांवर जी यौवनाची धुंदी ह्मणून भासते ती गर्वाची धुंदी असते. चालण्यांत जें औद्धत्य दिसतें तें मानसिक औद्धत्याचें अस्पष्ट प्रतिबिंब असतें. तरुणांच्या आश्चर्यपूर्वक उभारलेल्या भ्रुकुटींनीं किंवा हर्षोद्भूत रोमांचांनीं अनुभवशून्य बालिका चढून गेल्या तर त्यांत नवल तें काय ?

**धुरंधर**—बाह्यांगावरून अंतरंगाची अटकळ बांधण्याची तरुणांची प्रवृत्ति असते ही गोष्ट मला कबूल आहे. पण ही प्रवृत्ति तरुणांतच असते असें नाहीं, तर ती वृद्धांतहि दिसून येते. मुलीनें लवून नमस्कार केला, व विचारलेल्या प्रश्नांचीं खालीं मान घालून अस्पष्ट स्वरानें उत्तरें दिलीं, कीं त्यांना विनयाची परमावधि झाल्यासारखी वाटते. मग तें लवणें सौंदर्यांतील दोषांच्या व तो अस्पष्टपणा स्वराच्या कर्कशपणाच्या ज्ञानामुळें का झालेला असेना ! त्यांतून मुलीच्या आप्तांनीं पदर पसरला

व स्वतःस पदरांत घेण्याची विनंति केली, कीं वृद्धांच्या चौकस बुद्धीचें पूर्ण समाधान होतें. आणि हा जो कृत्रिम अनुकूल ग्रह झालेला असतो त्याला हुंडा, करणी, मानपान यांखालीं दाबून टाकिलें ह्मणजे तो शिथिल होण्याची मुळींच भीति रहात नाहीं. या कृत्रिम ग्रहाला आकाशांतील ग्रहांचा दुजोरा देण्याला जोशीहि एका पायावर तयार असतातच. याप्रमाणें आप्तांच्या किंवा ग्रहांच्या स्थितीवरून वधूचा अंदाज करण्यापेक्षां खुद्द वधूच्याच रूपावरून किंवा वर्तनावरून करणें श्रेयस्करच असणार.

**भार्गव**—रूपावरून ह्मणालांत तें ठीकच आहे. पण वर्तनावरून अंदाज बांधण्याची गोष्टच सोडून द्या. माझी खात्री आहे कीं, या शहरांत जमलेल्या स्त्रीवृंदांत जी सर्वांत अत्यंत सुंदर असेल तिलाच आपण सहधर्मचारिणी बनविणार,आणि बाकीच्या साऱ्याजणींना या तळ्याचा आश्रय करावा लागून आपलीं निस्तेज मुखकमलें त्यांतील कमलांच्या खालीं दडवावीं लागणार! शंकर यशस्वी वधूच्या नवसास पावला अशी त्याची दिगंत कीर्ति होणार, आणि ज्यांच्या नवसाला तो पावला नसेल त्या सगळ्याजणी स्वतःच आपलीं गाऱ्हाणीं घेऊन कैलासास गेल्यामुळें त्या शुभ्र कीर्तीला काळिमा लागण्याची भीतिच नको !

**धुरंधर**—ही केवळ अतिशयोक्ति आहे. तूं ह्मणतोस त्यांत मला इतकेंच तथ्य दिसतें, कीं फारतर माझ्या ऐश्वर्यावर प्रेम ठेवणाऱ्या कांहीं कुमारिकांची निराशा होईल.

**भार्गव**—ही आपत्ति घडूं नये अशी आपली इच्छा असल्यास त्याला एक उपाय आहे.

**धुरंधर**—तो कोणता ?

**भार्गव**—यशस्वी वधूला पट्टराणी करून निराश झालेल्या सगळ्या वधूंचा एक जनानखाना बाळगावा; ह्मणजे प्रत्येकीला निदान पंचवीसतीस वर्षांनीं तरी आपलें दर्शन घडत जाईल. प्रत्येकीला भर तारुण्यांत

एकएकदां दर्शन देऊन पुनर्दर्शन द्यावयास आपण जेव्हां जाल तेव्हां ती जख्ख म्हातारीच्या रूपानें आपणास दिसावयाची, एवढेंच काय तें यांत वैगुण्य आहे !

**धुरंधर**—या तुझ्या वर्णनानें माझी सारी हौस पार मावळून गेली.

**भार्गव**—बरें, आपण ज्या भाग्यशाली वधूस पट्टराणी करणार तिला तरी या योजनेपासून विशेष सुख होईल म्हणतां ? नांवच नको ! कारण आपली निवडणुकीची पद्धतच मुळीं एकांगी. आपण आपल्या आवडी-नावडीकडे काय तें लक्ष्य देणार. पण आपण तिला आवडत आहांत कीं काय, याकडे आपलें अगदीं दुर्लक्ष्य असणार !

**धुरंधर**—तुझी समजूत अगदीं चुकीची आहे. मीं हा वेष घेण्याचें मुख्य कारण हेंच कीं, माझ्या निवडीच्या वधूला मी आवडतों कीं नाहीं हें मला नीटपणें कळून यावें. मी राजा म्हणून जर मागणी केली असती तर या सगळ्याजणींनीं मजबद्दल तोंडदेखली पसंती व्यक्त केली असती. पण या वेषांत तसें होण्याची भीति मुळींच नाहीं.

**भार्गव**—नाहीं खरीच. कारण या वेषांत आपण एकीलाहि पसंत पडणार नाहीं.

**धुरंधर**—म्हणजे ? मजमध्यें आवडण्यासारखा एकहि गुण नाहीं का ?

**भार्गव**—नाहीं असें मी कसें म्हणूं ? कारण आपण धुरंधरमहाराज आहांत हें मला माहित आहे. पण ज्यांना म्हणून तें ज्ञान नाहीं अशा मुली अशा डौली ज्योतिष्यावर भाळतील असें माझ्या अल्प बुद्धीला वाटत नाहीं. या पोरी हल्लीं ज्योतिष्याला मान देतात तो साधन म्हणून. पण तोच ज्योतिषी साध्य म्हणून त्यांच्यापुढें मांडला तर त्या त्याला ताबडतोब झिटकारून टाकतील. शिवाय जे गुण राजाच्या वेषांत आपणास शोभतात ते ज्योतिष्याच्या वेषांत नडतील मात्र. आपली ही चालण्याची ऐटदार ढब आपण गर्विष्ठ आहांत असा समज उत्पन्न करील. आश्रितांस वरिष्ठांशीं ज्या अदबीनें वागावें लागतें तिचा आपल्या ठायीं असलेला पूर्ण अभाव आपणावर व्यवहारशून्यत्वाचा

आरोप करवील. आपलें औदार्य आपणास उधळ्या व दिवाळखोर ह्मणून भासवील. सारांश 'राजा' या नांवाची जादू नसल्यास मनुष्यास काय काय अडचणी येतात त्यांची आपणास पूर्णपणें जाणीव उत्पन्न होईल. आपणास जशी नम्र, चतुर, धोरणी अशी वधू असावीशी वाटते, त्याप्रमाणें वधूसहि त्या गुणांचा पति असावा अशी इच्छा होणें साहजिक आहे.

**धुरंधर**—मला हल्लीं जो अनुभव येत आहे त्याचें तूं बरेंच हुबेहूब वर्णन केलेंस खरें.

**भार्गव**—बरें, आपण आज चार दिवस गंगूताईचें निरीक्षण करीत आहांत. आपला त्यांजबद्दल काय ग्रह झाला आहे ?

**धुरंधर**—तिचें रूप खरोखर अद्वितीय आहे. तिला निर्माण करितांना ब्रह्मदेवानें आपलें बुद्धिसर्वस्व खर्चीं घातलें असलें पाहिजे. आतां तिच्या अंगीं जरा अभिमान आहे खरा. पण तो दोष कालानें जाण्यासारखा आहे.

**भार्गव**—( हंसून ) माझेंच ह्मणणें खरें झालें शेवटीं ! अप्रतिम रूपाच्या तेजानें मोठमोठ्या दोषांनाहि लोपवून टाकिलें ! तथापि ज्याअर्थीं हा दोष दिसण्याइतकी तारतम्यबुद्धि आपल्या अंगीं अजून राहिली आहे, त्याअर्थीं गंगूताई आपल्या स्वामिनी होणार नाहींत हें भविष्य मी आजच सांगून ठेवितों.

**धुरंधर**—भविष्यवादीपणांत मला स्थानभ्रष्ट करण्याचा तुझा इरादा दिसतो.

**भार्गव**—बरें, गंगूताईचा आपणासंबंधानें कसा काय ग्रह झाला आहे ?

**धुरंधर**—तो पहाण्याला मला अजून सवडच झाली नाहीं.

**भार्गव**—एकूण याहि बाबतींत मीच खरा ठरलों तर ?

**धुरंधर**—भार्गवा, माझें एक राहिलें. तुझें यमुनेबद्दलचें कसें काय मत झालें आहे ?

**भार्गव**—गंगूताई जर विधात्यानें बुद्धिसर्वस्व खर्चून उत्पन्न केल्या असतील, तर यमुनेस त्यानें कल्पनासर्वस्व खर्चून निर्माण केलें असलें पाहिजे. कारण असे अवयव कल्पनेच्या भरारींतच निघणें शक्य आहे.

**धुरंधर**—( एकीकडे ) गंगूस उद्देशून बोलतांना यानें ताई हें उपपद लाविलें, पण यमुनेचा निर्देश साध्या नांवानेंच केला, याचें इंगित काय असावें बरें ? अत्यंत औदासीन्य किंवा निःसीम प्रेम ? याच्या वर्णनावरून औदासीन्य नसेलसें वाटतें. एकूण वधूपरीक्षेचें काम स्वतःशिवाय इतर तरुणांकडे न सोंपविणेंच बरें. ( उघड ) भार्गवा, तुला सुद्धां सौंदर्याच्या वर्णनांत दोषांचें भान राहिलें नाहीं असें दिसतें. शिवाय यमुनेचें निरीक्षण तूं माझ्या वतीनें न करितां स्वतःकरितांच करीत होतास असेंहि दिसतें.

**भार्गव**—यमुनेला पहाण्यापूर्वींच आपणाला मजबद्दल मत्सर वाटूं लागला वाटतें ? पण अजून मीं दोषांचा पाढा कुठें वाचला आहे ? तो ऐकिला ह्मणजे आपला मत्सर अस्थानीं आहे अशी आपली खात्री होईल. एकतर यमुनेचा स्वभाव पराकाष्ठेचा हट्टी आणि हेकेखोर.

**धुरंधर**—( एकीकडे ) अजून भार्गवास यश मिळालेंसें दिसत नाहीं.

**भार्गव**—एकदां तिच्या डोक्यानें एखादी गोष्ट घेतली, कीं ब्रह्म-देवाच्यानें सुद्धां ती बदलणें शक्य नाहीं. अशा प्रसंगीं तिची भ्रुकुटि वक्र होऊन तिचे दंत अधरास खिळवून टाकितात, ती शोभा अवर्ण-नीय दिसते.

**धुरंधर**—( एकीकडे ) यमुनेचें प्रेम आकर्षून घेण्यांत याचा कांहीं हेतु असेल का ? ( उघड ) भार्गवा, मीं स्वतः वधू निवडण्याचा जो विचार केला आहे,तो तुला पसंत नाहीं असें मला वाटावयाला बरींच कारणें झालीं आहेत. आजपर्यंत परदेशीं सुद्धां तूं मजवर बंधूप्रमाणें निर्व्याज प्रेम करून मला अनेक संकटांतून सोडविलेंस, तें प्रेम हिंदु-स्थानचा वारा लागल्याबरोबर मालवलें कीं काय ? तुझी माझ्या बेताला इतकी प्रतिकूलता कां असावी ?

**भार्गव**—सांगूंच आपणाला ? महाराज, गंगूताई आणि यमुना या जिच्या दासीहि शोभणार नाहींत अशी एक वधू मला माहित आहे. गंगूताईस निर्माण करून विधात्यानें आपल्या बुद्धिवैभवानें एक कूट सोडविलें, व यमुनेला निर्माण करितांना त्याची विशाल कल्पना एक सुंदर स्वप्न रचीत होती, असें ह्मणतां येईल. पण मीं ज्या वधूचें नुक्तेंच वर्णन केलें ती त्याच्या कल्पनेंतून निघालेली व बुद्धीनें रेंखलेली काव्यकृतिच होय, यांत शंका नाहीं.

**धुरंधर**—मग तिला दाखविण्यास विलंब कशाला ?

**भार्गव**—योग्य वेळीं मी ती आपल्या दृष्टीस पाडीनच.

**धुरंधर**—असो; आपणांला येथून लवकरच हललें पाहिजे. आपल्या सोबतिणी आपली वाट पहात असतील. शिवाय हा वृद्ध गृहस्थ टेहळणी करीत इकडेच येत आहे. त्याच्या कानांवर आपलें संभाषण जाऊन उपयोग नाहीं.

**भार्गव**—त्याचें लक्ष्य आपणांकडे आहे कुठें ? स्वारी येथील युवतींचीं मुखें निरखण्यांत दंग झाली आहे. हे गृहस्थ येथील न्यायाधीश आहेत ह्मणून ऐकतों. पण न्यायापेक्षां रूप निवडण्याच्या कामांतच स्वारींची कुशाग्र बुद्धि अधिक खर्चीं पडत असली पाहिजे. गृहस्थाच्या डोक्याला येवढें टक्कल पडलें आहे, कीं कोणाहि सुंदरीची दृष्टि त्यावर ठरणें अशक्य आहे; आणि शेंडी इतकी जीर्ण झाली आहे, कीं ज्याप्रमाणें चिलटें चवरीला भिऊन दूर सरतात त्याप्रमाणें सुंदरींचे कटाक्ष तिच्या वाऱ्यालाहि उभे रहाणार नाहींत. डोळे, गालफडें व ओंठ हीं इतकीं खोल, आणि नाक व हनुवटी इतकीं उंच गेलीं आहेत, कीं या उंचवट्यावर एक क्षणभर राहिल्यास आपण त्या खोल दऱ्यांत पडूं अशी स्त्रियांच्या नेत्रांस भीतिच वाटावी. असें असतां या थेरड्याला येथें घिरट्या घालून काय लाभ मिळणार ? असो; स्वारी रूपनिरीक्षणाच्या नादांत अगदीं आपल्या अंगावरच आली. चला तर येथून.

[ दोघे जातात.

(पडद्याबाहेर येऊन स्वतःशीं)ताई,या अवाढव्य जगांत तुला
अष्ट दिशांबद्दल एकच दिशा जर निर्माण झाली असती तर
देह पडेपर्यंत तुझ्या शोधार्थ चालत गेलों असतों. पण
पैकीं मीं कोणती निवडावी, कीं त्या दिशेनें गेल्यास तूं
पडशील ? याचा विचार करितां करितां माझें मन अष्टधा
गेलें आहे. बरें, तूं असशील तरी कोणत्या स्थितींत ?
दर महालांत असेल कीं भिकार झोंपड्यांत ? तुला सुग्रास
न मिळत असेल कीं वाळलेलें कदन्न ? तुझ्या पाठीला उंची
असतील कीं फाटकीं चिगुरटें ? चालतांना तुझे पाय मऊ
पडत असतील, कीं कांट्याप्रमाणें खुपणाऱ्या जमिनीवर ?
च्या दरींत पडली असशील,तर तुला सुखपर्वताच्या अत्युच्च
साविण्याचें मला सामर्थ्य आहे. पण तुझें वास्तव्यच माहित
मी पंगूपेक्षां पंगु बनून गेलों आहे. या रमणीगणाप्रमाणें
लालसेनें आकर्षून येथें आणिलें असेल का ? पण तसें
वें, तर तुझें लावण्यरत्न या हिरकण्यांमध्यें लपून कां रहावें ?
ांत पूर्ण तेजानें तळपत असतां त्याला शोधण्याकरितां
ांचपडत जावें लागतें का ? का तुझी प्राणज्योतिच माल-
नी समजूं ? तसें झालें असेल तर माझ्याहि आयुष्याची इति-
संपली. असो, असे हातपाय गाळून कांहीं उपयोग होणार
येथील 'दुंदुभि' पत्रांत जी जाहिरात दिली आहे, तिचा उप-
ा ताईचा पत्ता लावण्यांत बराच होईल. त्वरित व खात्रीचा
ेवटचा उपाय कितपत सिद्धीस जातो हें पहावयाचें आहे.
ही पहा यमुना आपल्या दासीसह माझीच वाट पहात आहे.
तां आणखी विलंब करितां कामा नये.

[ जातो.

---

## प्रवेश चवथा.

[ प्रयागपंडित व खंडेराव कोतवाल. ]

**प्रयाग०**—कोतवाल,मी महेश्वराच्या देवळाकडे दर्शनाला गेलों होतों, त्यामुळें मला घरीं यायला जरा उशीर झाला. तुह्माला माझ्याकारितां फार वेळ तिष्ठत बसावें लागलें नाहींना?

**खंडेराव**—वाडुळ बसूनशान न्हायलों म्हून काय जालं सरकार? सरकारच्याच कामापायीं बसून न्हायलों का दुसऱ्या कुनाच्या? येक यिळा ही तायताची प्वार आपनास्नी गवसूनशान दिली, झंजी ह्यो भादर सुटला पगा. मातुर गरिबाची सरकारास्नी याद न्हाया व्होवी. न्हाई तर आवाच्या रंगामंदी इसरून जायाच !

**प्रयाग०**—कोतवाल, शुद्धीवर आहांत ना?

**खंडेराव**—गुना जाला धनीसाब. कशीबी येकांदी फटाकडी अस्तुरी गवासली, तरीबी आपुन ह्या गाडिच्याला इसराल व्हय? न्हाई न्हाई. ह्मेत आपल्या हातनं कंदीबी न्हाई व्हनार. ज्ये मनुक्ष असं ह्मंत्याल त्ये अक्षी लबाड पगा.

**प्रयाग०**—मजबद्दल कोणी कांहीं ह्मणतात कीं काय? ह्मणत असल्यास काय ह्मणतात तें सांगा पाहूं.

**खंडेराव**—कानत्या त्वांडानं सांगूं, सरकार? लई वंगाळ बोलत्याती. आपन आपलं मन आबाळावानी मोटं कराया व्होव.

**प्रयाग०**—तरी पण तें मला कळलेलें बरें.

**खंडेराव**—लोक ह्मंत्यात, इक्ता अक्षी थ्येरडा जालाया, पन आजून आवा ह्मेरली का तरन्यावानी डोळ मिचकावतुया, आन् दुसरबी इस्काच ढंग करतुया. म्यां ह्ये ऐकलं पगा, आन् इकुता ह्यो मरद खवाळला ह्मंता का अक्षी इचारू नका पगा. मला असं बी वाटाया लागलं, का लोक आपनाह्मी असं वंगाळ बोलत्याती, मंग आपुनबी द्येवावानी हात जोडून-शान् कशापायी बसा? आपुनबी लई लई फटाकड्या आवा घ्येराव्या, आन् उडवावा रंग आन् काय? दारू बी द्येवी ठांसून. ह्यो गडी असा

इनाकारन न्हाइ कुनाचं ऐकूनशान घ्येनार, सरकार. कुनी बोलल त त्ये करूनशान् दावनारच.

**प्रयाग०**—गळ्यांत जस्ती ताईत असलेली मुलगी शोधून काढण्याची मीं जी कामगिरी तुमच्याकडे सोंपविली आहे, ती कशाकरितां असा तुमचा समज आहे?

**खंडेराव**—कशापायी ह्मंतासा? तिला लग्नाबिगर घरी ठिवायापायीं? असं कोन ल्योक ह्मनल त्येच्या तोंडावर पालता पायपूस. आपुन तिच्यासंगं लगान लावनार आन् काय! धनीसाब, आपुन मोट इचारी पगा. आपनास्नी त्या आवाच्या गळ्यामंदी ताईत व्होवा, आन त्योबी काय ह्मंता त्ये जस्ताचा व्होवा. त्येच्या बिगर आपुन न्हाई तिच्यासंगं लगान लावनार. येकांदा दुसरा गडी असता, तर येकांदी फटाकडी घ्येऊनशान घालायचा घरांत, आन् मंग अडकावायचा ताईत गळ्यामंदी!

**प्रयाग०**—कोतवाल, मीं आजपर्यंत माझ्या चरित्रांतील जें रहस्य मनांतल्या मनांत दाबून ठेविलें होतें, तें मला या तुमच्या कुशंका ऐकून सांगणें भाग आहे. शिवाय तें तुह्माला सांगितल्यावांचून गत्यंतर नाहीं अशी वेळ आली आहे. मात्र हें रहस्य कोणापाशीं न सांगण्याचें मला तुह्मीं वचन दिलें पाहिजे.

**खंडेराव**—या पायावर हात मारूनशान् सांगतो सरकार, आंदी माजा परान जाईल, आन् मंग ह्ये गुपित वटाभाईर निगल.

**प्रयाग०**—ऐका तर मग. येत्या विजयादशमीला अठरा वर्षें पुरीं होतील. त्या वेळीं माझी प्रियकर पत्नी निवर्तून फार थोडे दिवस झाले होते. ज्या मुलीचा शोध तुह्मी माझ्या सांगण्यावरून करीत आहांत ती आमचें एकुलतें एक अपत्य. तिला जन्म देतांदेतांच माझ्या कुटुंबाचा अंत झाला. मुलगी अगदीं नक्षत्रासारखी होती. पण ही कपाळकरंटी आपल्या स्त्रीच्या नाशास कारण झाली, असें मला वाटून मीं तिचा त्याग करण्याचा निश्चय केला, व पत्नीच्या अस्थि घेऊन क्षेत्रास जाण्याकरितां निघालों. बरोबर मुलीला घेतलें होतेंच. वाटेंत एक लहान खेडें

होतें, तेथें एक कुलीन व कुटुंबवत्सल पण गरीब ब्राह्मण रहात होता. त्याच्या स्वाधीन विजयादशमीच्या मुहूर्तावर ती सोन्यासारखी मुलगी केली, आणि नंतर मी तीर्थयात्रा करण्याकरितां निघालों. मुलगी स्वाधीन करितांना मीं त्या ब्राह्मणास तिचें पालनपोषण करण्यास पुरून उरेसें द्रव्यहि दिलें होतें. पण न जाणो कदाचित् ब्राह्मणाची बुद्धि फिरावयाची, आणि तो द्रव्य गिळंकृत करून वर मुलीचा त्यागहि करावयाचा, अशी भीति वाटून व तसें झाल्यास मुलगी पुढें ओळखतां यावी ह्मणून मीं एका कागदावर एक सांकेतिक आकृति काढून त्याचा अर्धा तुकडा एका जस्ती ताइतांत घालून आणिला होता, तो ताईत मुलीच्या गळ्यांत अडकावून दिला,आणि दुसरा तुकडा मजपाशीं ठेविला. कळलें का मीं काय ह्मटलें तें ?

**खंडेराव**—व्हय व्हय, अक्षी नामी ह्येरल.

**प्रयाग०**—यात्रा करून परत येतेवेळीं मुलीचा त्याग केल्याबद्दल मला पूर्ण पश्चात्ताप झाला, व तिला त्या ब्राह्मणापासून मागून घेण्यासाठीं त्या खेड्यांत आलों; तों काय? सर्व सामसूम ! ब्राह्मण बाहेरगांवीं पळून गेला असें कळलें. देवानें माझ्या निष्ठुरपणाबद्दल हें योग्य शासन केलें असें मला वाटलें. मी शहरांत परत आलों. राणीसाहेबांनीं मेहरबानीनें मजकडे पूर्ववत् न्यायाधीशाचें काम चालू ठेविलें. पण त्यांना काय माहित, कीं न्यायासनासमोर येणाऱ्या गुन्हेगारांपेक्षांहि नीच असा पुरुष त्या गुन्हेगारांचा न्याय करीत आहे ! बाहेरून जरी मी लोकांस भाग्यवान् वाटें, तरी मी आंतून पश्चातापानें करपून जात होतों. कोतवाल, माझें वय मी दिसतों त्यापेक्षां वीस वर्षांनीं तरी कमी आहे. हीं वार्द्धक्याचीं चिन्हें आंतील शोकाग्नीचा परिणाम होत. चेहऱ्यावरील या सुरकुत्या त्या शोकाग्नीच्या तापामुळेंच पडलेल्या आहेत, व केसांची ही पांडुरता त्या अग्नीची रक्षाच होय. धुरंधरमहाराज विलायतेहून परत येऊन लग्न करणार, ही बातमी कानांवर आली तेव्हां तर माझ्या मनःसंतापाची परमावधि झाली; आणि मी

माझ्या बाळेचा शोध लावण्याच्या खटपटीला जारीनें लागलों. त्या कामीं मीं तुमची योजना केली, आणि स्वत:हि रोज देवळाकडे खेपा घालून तेथें जमलेल्या मुलींच्या गळ्यांतील अलंकार निरखून पाहूं लागलों. त्याचा काय परिणाम झाला हें तुह्माला माहित आहेच. वास्तविक पहातां मी त्या सर्व मुलींकडे केवळ पितृप्रेमानेंच पहात होतों. असो, तुमच्या-बरोबर नुक्तेंच राणीसाहेबांना देण्याकरितां ह्मणून मीं जें पत्र दिलें होतें, त्यांतहि त्यांना कांहीं दिवस बाळासाहेबांच्या लग्नाचा बेत तहकूब करण्या-विषयीं विनंति केली होती. ही गोष्ट तुह्माला माहित नसेलच ?

**खंडेराव**—कशी ह्याईत असनार, सरकार ? आमी ह्मंजी अक्षी वज्याची गाडवं. साकार भरा न्हाईतर उकिरडा भरा.

**प्रयाग०**—आज दुंदुभिपत्राचा हा ताजा अंक हातीं पडला, त्या-वरून माझ्या बाळेचा शोध लागण्याची आशा वाटूं लागली आहे.

**खंडेराव**—प्वार गवासली असं लिवलया व्हय त्येच्यामंदी ?

**प्रयाग०**—इतकें सोपें तें काम नाहीं. त्यामध्यें फक्त ही जाहिरात आली आहे. ही वाचली ह्मणजे तुह्माला कळून येईल मी काय ह्मणतों तें.

**खंडेराव**—मी हकड येताइळला आरशी इसरलो आनाया. न्हाई-तर वाचूनशेनी पगितलं असतं.

**प्रयाग०**—मी वाचतों ऐका:—'सत्रा वर्षांपूर्वीं विजयादशमीचे मुहूर्ता-वर एका इसमानें एक अमोल ठेव दुसऱ्याच्या स्वाधीन केली. त्या दोन इसमांपैकीं एकादा येथील स्मशानांत शनिवारीं मध्यरात्रीं आल्यास त्यास मोठा लाभ प्राप्त होईल. ती ठेव अंतीं एका राजकुलीनास मिळ-णार आहे. ह्मणून राजकुलीनांनीं कोणत्याहि महत्त्वाच्या बाबतींत घाई करूं नये.'

**खंडेराव**—माज्या तर योक सबूदबी न्हाई ध्येनांत आला. पन इक्तं मातुर खरं का ह्येच्यामंदी दगा हाय. रातच्या पारीं मसनवाटींत न्येऊन-शान गडाप करन्याचा ब्योत दिसतुया येकांद्या येताळाचा.

**प्रयाग०**—खालीं 'वेताळ' ह्मणून सही केली आहे खरीच.

**खंडेराव**—इक्ती वरसं कोतवालचाकरी करतुया म्हून कंदीकंदी डोकशामदून इक्ती नामी युगत निगतीया.

**प्रयाग०**—पण तुमचा बाकीचा तर्क मात्र सपशेल चुकला.

**खंडेराव**—नसल येताळ तर हडळ असल. योकच. त्येचाच बा त्यो.

**प्रयाग०**—नाहीं, तसेंहि नाहीं. ही जाहिरात देणारास माझ्या बाळेचा पत्ता जरी माहित नसला तरी मला चांगली मदत करण्याइतकी तिजबद्दल माहिती तरी त्यास खास आहे.

**खंडेराव**—मंग काय इचार ठरतुया सरकार?

**प्रयाग०**—विचार काय ठरायचा त्यांत? तुह्मीं आज रात्रीं याचा छडा लावण्यासाठीं स्मशानांत गेलें पाहिजे.

**खंडेराव**—( एकीकडे ) अगबया? इक्त्यामंदीच माज हातपाय प्येंडुळल! ( उघड ) न्हाई सरकार, ह्ये काम आपनासूनींच ग्वाड दिसतं. प्वार आपली, तवा आपुनच जानं ह्ये चखोट. मी पल्डो गरीब मानुस. तिनं बाबा म्हून माज्याच गळ्याला मिटी मारली तर त्ये लोकांमंदीबी ग्वाड न्हाई दिसनार.

**प्रयाग०**—स्मशानांत कशाला मरायला येतात लोक? तुह्माला पुढें करण्यांत माझा दुसराहि एक हेतु आहे. त्या मुलीचा बाप मी आहें, हें जर उघड झालें तर एखादा भामटा खोटीच मुलगी माझी ह्मणून मजवर लादायचा. धुरंधरमहाराजांचा तोतया उभा राहिला, तसाच प्रकार येथेंहि व्हावयाचा. तें कांहीं नाहीं. तुह्मीच त्या मुलीचा बाप ह्मणून पुढें आलें पाहिजे, आणि त्याकरितांच मीं तुह्माला सर्व इत्थंभूत हकीगत सांगितली ती.

**खंडेराव**—लई ह्मेरबानी जाली आपली. पन ह्ये संमदं हुयाचं कसं? मसनवाटीमंदी जितपनी जायाचा माजा कंदीबी इचार न्हवता. माज्या हातून इक्ती मानसं फासावर चल्ड्यात आन् भुतं झाल्यात, का ह्यो तत म्येला ह्मना, का समदी भुतं खिनामंदी चटनी करूनश्यान टाकत्याल.

**प्रयाग०**—कोतवाल, तुह्मी असे भित्रे असाल अशी मला कल्पना नव्हती.

**खंडेराव**—ह्यो मरद तसा भियाबियाचा न्हाई, सरकार. फकत इक्ताच इचार मनांत आला व्हता, का कुनालाबी सोबत घिऊन—तसं न्हव, सोबतीला कुनालाबी घिऊन—तसंबी न्हव—कुनाबी भित्र्या भागूबाईसंगाट सोबत ह्मून मी ग्येलो तर काइबी वंगाळ न्हाई ना?

**प्रयाग०**—छे छे छे. तुमच्याबरोबर तर कोणींच असतां कामा नये.

**खंडेराव**—माज्यासंगं कोनी असं न्हाई मी ह्मंगालो, कोनाबी संगं मी ह्ये ह्मंगालो.

**प्रयाग०**—शब्दांची फिरवाफिरव करून अर्थ थोडाच बदलतो! तें कांहीं चालायचें नाहीं, तुह्मी एकटेच गेलां पाहिजेत.

**खंडेराव**—( एकीकडे ) मी जाईल येकटा. पन भुतं करत्यालना मला दुकटा आन् तिकटाबी.

**प्रयाग०**—कोतवाल, या कामांत तुमची कोणतीहि कसूर दिसतां कामा नये. तुमच्या सुस्तीबद्दल आजपर्यंत तुह्माला अनेकदां ताकिदी द्याव्या लागल्या आहेत.या वेळीं तरी निदान तसला प्रसंग येऊं देऊं नका. हें आणि त्या तोतयाचें काम नीट बजावाल, तर बक्षीस मिळून अधिक योग्यतेलाहि चढाल. न बजावाल तर मात्र नोकरीला मुकावें लागेल.

**खंडेराव**—(एकीकडे) इचिभनं कसं करावं आतां? लइ पचाईत आलिया. ( आठवल्यासारखें करून ) हां, ही युगत लई नामी. शिरप्यालाच दामटावा आन् काय? म्येला तर ब्याद ग्येली ! (उघड) ठीक हाय, सरकार. आपला हुकूम परमान.सरकार, माझा पोरगा आजवर व्हता गांवीं. त्येला माज्या मनातून द्यायचा हाय सरकारच्या दिमतीला.

**प्रयाग०**—तुमचा मुलगा? तुह्माला मुलगा असल्याचें माझ्या कधीं ऐकण्यांत नव्हतें.

**खंडेराव**—माजा ह्मंजी माज्या कारबारनीचा, सरकार.

**प्रयाग०**—तुमचा काय आणि तुमच्या कारभारणीचा काय, एव
नाहीं का ?

**खंडेराव**—तसं न्हवं सरकार. माझ्या कारबारनीचा पहिल्या दा
ल्याचा त्यो ल्योक. आला गाईमागून वासरावानी.

**प्रयाग०**—अस्सें !

**खंडेराव**—भाईर बसलाय ! हंगू त्येला आमंदी ?

**प्रयाग०**—आह्माला चांगल्या कुलीन तरुणांची फार जरूर आ
आणा त्याला आंत.

**खंडेराव**—सरकारची कुरपा. ( आंत जाऊन श्रीपतीस आणते
श्रीपति मुजरा करतो.) ल्योका, वाईच वांकून मुजरा क्येलास तर प्येक
मोडल न्हय ? असा कटाळा करून कसं चालल ? मनामंदी नस
तरीबी गरिबीचं स्वांग घ्याया न्होवं. ( श्रीपति लवून मुजरा करितो. )

**प्रयाग०**—मुलगा सरळ दिसतो.

**खंडेराव**—अक्षी सरळ हाय बगा येळूच्या काटीवानी. वाकला त
तुकडाच पडल जनु ! पोरा, सरकारची अशी चाकरी करतुस कीं यंव
मंग त्यामंदी भुताच्या हातून मरान आल तरीबी वंगाळ न्हाई.

**प्रयाग०**—बरें आहे, तुह्मी जा आतां. शनिवारीं रात्रीं घडलेलें वर
मान कळविण्याला मजकडे रविवारीं सकाळीं या.

( पडदा पडतो. खंडेराव व श्रीपति बाहेर येतात. )

**खंडेराव**—ह्ये बग पोरा, खोटपनाची पहिली पकड त तुला दाऊन
शान् दिली न्हव? शेरामंदी ह्येच्या बिगार येक खिनबरबी चालायचं न्हाइ

**श्रीपति**—ह्येत मला लई वंगाळ गवासतया.

**खंडेराव**—बगून घ्या पोराचं श्येनपन ! आपल्या बाला शिकवतुया
पोरा, तुला खोटं बोलनं वंगाळ वाटत न्हय ? घ्ये तर मंग त्येच शास्तार
ज्येला खोटं बोलायचं, त्येनं आदी मनाला हटकावं का मी खोटं बोलतो
ह्मून, आन् मंग लावावा सपाटा. ह्यंजी मग त्येच्यामंदी पाप कुठं न्हायलं
मी रातदिन असंच करतुया.

**श्रीपति**—बाबा, ह्ये न्हाई माज्या बाच्यानं व्हनार.

**खंडेराव**—तुज्या बाच्यानं व्हतं ह्मून तर मी तुला सांगतुया. आन् तूं ह्मंगतोस व्हनार न्हाई ह्मून. बापापुनबी ब्येटा श्येना.

**श्रीपति**—मी अक्षी उगडउगड सांगतुया—

**खंडेराव**—ह्ये काय ल्येका, ख्येडगळावानी उगडंन् नागडं करीत बसला हैस ? शेरच्या इद्वानावानी सपस्ट असं ह्मन. ह्येलाच सवंस्कुत्र ह्मनत्यात. वंगाळ असलं तरीबी त्ये सवंस्कुत्रामंदी ह्मंतलं मंजी ग्वाड दिसतं. आपुन अन्याव ह्मनतो न्हव, त्येलाच त्ये बोलींत ह्मनत्यात न्याव ! अग्यानाला ह्मनत्यात ग्यान, आन् इस्कुलाला बी ह्मनत्यात स्कूल ! असा त्येंचा समदा उपराटा परकार ! म्हून वंगाळ काम करावं ह्मराटीमंदी आन् ब्वोलावं सवंस्कुत्रामंदी; मंजी द्येवाह्मोर त्येच समद गुन्ह माफ ! आपला समदा धरम हाय सवंस्कुत्रामंदीच.

**श्रीपति**—हत संमदीं वंगाळच कामं कराया व्होवींत ह्मनता ?

**खंडेराव**—अडानी र अडानी ! अक्षी बिचाकला प्वोर. प्वोरा, तुला चखोट काम व्होवं ह्मनतुयास ? थांब वाइच. आलं माज्या ध्येनांत. ह्ये पग, तुला परथम वागावानी धीट कराया व्होवं. आसं न्हाइ क्येलं तर मंग ह्मोर भागूबाई व्हयाचा ! त्वां कंदी मसनवाट पग्रितली हैस ?

**श्रीपति**—आन् रोजच्यारोज पगतुया न्हव का ?

**खंडेराव**—ही ख्येड्यांतली मसनवाट न्हव; शेरामंदली हाय ! हत येताळ, राकुस, हडळी, डक्नी आन् जखनी, उपराव्या पायानी रातचा नाच नाचत्यात, आन् मनुक्षाला गट करत्यात. ख्येड्यावानी गरीब भुतं हतं न्हैती.

**श्रीपति**—मंग तर हतं लई गंमत पगाया गवासनार आमास्नी ! भ्या तर कंदीबी भूत पाह्यलं न्हाई.

**खंडेराव**—तुला भ्या न्हाइ वाटायचं ?

**श्रीपति**—आन् भ्या त्ये कशापायी ?

**खंडेराव**—अक्षी ख्येडगळ हैस ! म्येवं कशाला त्येबी तुला ठावं न्हाई ! थू: तुज्या जिनगानीवर ! पन् ह्येबी ठीक जालं ! परवां श्येनवारीं मद्यानरात्च्या पारीं तुला मसनवटांत जाया व्होवं.

**श्रीपति**—मी तर सांजपुनच ततं जाऊन बसतों.

**खंडेराव**—ह्ये तर समद्यापुन ब्येस ! ह्ये बग, ततं कोन येतया, काय बोलतया ह्ये ध्यान ठिवून बगून घ्ये, आन् अक्षी प्हाटंच मला येऊन-श्यान सांग.

**श्रीपति**—आन् मद्रातीच्या भरवख्तीं मला झ्वाप लागली तर मंग कसं ?

**खंडेराव**—मसनवाटींत तुला झ्वाप लागल व्हय ? अन् तूं डोकसं कशाला व्येकनार ?

**श्रीपति**—आन् ततं अर्दमुर्द जळल्याल मुरद कमीच असत्याल !

**खंडेराव**—वार माजा वाग ! सोबतुयास खरा माजा ल्योक ! आतां मी सांगतु तसं कर. मद्यानीपोतुर उब्याउब्यानं न्हाउनश्यान् मसनवाटींमंदी प्हारा कर, आन् कोन काय करतया त्ये ह्येरूनशान् ठ्येव ! आन् मंग उशापायथ्याप व्होव तिक्त मुडद घ्येउनश्यान् खुशाल मुडद्या-वानी निजून न्हा ! थंड वाजाया लागली तर येकांद्या मुडद्याचं कांबरूनबी कर; माजी ना न्हाई. पर हो; ह्ये पग; येवडं ध्येनांत ठ्येव ! कुनाला उमगूं घेऊं नग का ततं मी है कां तूं हैस आसं. मीच ततं हाय जनू !

**श्रीपति**—त्येची काई फिकर न्हाई बगा ! तोंडावरन येकांदा मुडदा घ्येतला का काम श्याप ! ( स्वगत ) कुनाच्या बालाबी उमगा-यचं न्हाई का ती मुडद्याची कळा हाय का माझ्या बाची सूरत हाय !

[ जातात.

---

## प्रवेश पांचवा.

[ धुरंधर, वाराणशी, गंगू, यमुना, त्रिवेणी. ]

**वाराणशी**—अहो जोशीबुवा, तुमच्या भाकिताबद्दल आज सगळें शहर वाखाणणी करीत आहे. पण तुमच्या चातुर्याचा आह्मांला मात्र अजून मासला पहावयाला मिळाला नाहीं.

**धुरंधर**—याचें एक कारण असें, कीं आपल्या मुलीसारख्या ज्या अद्वितीय सुंदर युवति असतात त्यांच्या हातांवरील रेषांपेक्षां रूपरेषेवरूनच त्यांच्या भावी उत्कर्षाची अटकळ बांधिता येते; व तें काम सामान्य जनांसहि साध्य असतें. दुसरें असें, कीं ज्याप्रमाणें वैद्याला आपल्या आप्तांची रोगचिकित्सा शांत व निश्चल बुद्धीनें कारितां येत नाहीं, त्याप्रमाणें ज्योतिष्यासही आपल्या आश्रयदात्यांचें भविष्य बुद्धीचा समतोलपणा ठेवून वर्तवितां येत नाहीं. याप्रमाणें आपल्या मुलीचें अचुक भविष्य सांगणें एका दृष्टीनें अनावश्यक व दुसऱ्या दृष्टीनें अशक्य आहे.

**यमुना**—काकू, आपले जोशीबुवा हात पाहून भविष्य सांगण्यापेक्षां तोंड पाहून बोलण्यांतच अधिक हुशार दिसतात, नाहीं बरें?

**वाराणशी**—यमुने, तूं किनई बोलण्यांत एकाद्या पंडितालासुद्धां हात टेंकायला लावशील. तुला नवरा तुझ्यासारखा पंडितच शोधून काढला पाहिजे.

**यमुना**—ह्मणजे राजा नको असेंच ना तुमचें ह्मणणें? मला तर बाई यांत कमीपणा न वाटतां धन्यता वाटते. राजा किती जरी बलाढ्य झाला, तरी त्याची सत्ता आपल्या राज्यापुरती. उलट पंडिताची सत्ता साऱ्या जगावर चालते.

**धुरंधर**—( एकीकडे ) असें स्पष्ट बोलणें मला राजा या नात्यानें कधींच ऐकायला सांपडलें नसतें.

**वाराणशी**—यमुने, हीं बोलणीं कुठपर्यंत? जोंपर्यंत धुरंधरमहाराज वधूची निवड करण्याकरितां समोर आले नाहींत, तोंपर्यंतच.

**यमुना**—जोशीबुवा, पुरे आतां ही थट्टा! दुसऱ्या कोणाचें नाहीं का सांगायचें भविष्य?

**गंगू**—आह्मांला तुह्मीं परिचयाचा काळ सांगितलात; पण स्थळ नाहीं अजून सांगितलेंत तें?

**यमुना**—गंगूताई, पुरे कर बाई तुझा चावटपणा! जोशीबुवा, माझ्या गळ्याचीच शपथ आहे तुह्माला आतां आणखी कांहीं बोलाल तर.

**धुरंधर**—तुमच्या कानांत सांगितलें तर?

**यमुना**—हं, त्याला कांहीं हरकत नाहीं.

**धुरंधर**—(स्वगत) हिचें भार्गवावर प्रेम आहे कीं काय हें काढायला ही संधि बरी आहे. ( यमुनेच्या कानांत कुजबुजतो; ती दचकते. )

**वाराणशी**—(एकीकडे) खास येथें कांहींतरी पाणी मुरतें आहे.(उघड) यमुने, बरें झालें बाई, तूं तरी लग्नाच्या विवंचनेंतून सुटलीस. (स्वतःशीं) यमुनेचा तर बंदोबस्तच झाला. आतां ही कारटी त्रिवेणीच काय ती माझ्या लाडकीच्या वाटेंत विघ्न आणणारी उरली आहे. लहानपणापासून मुलीसारखी पोसली, नाहीं नाहीं ते लाड पुरविले, पण अखेर आपल्या हलक्या कुळाच्या वळणावरच जायची. हिला एकदां दूर केव्हां करीनसें झालें आहे. ( उघड ) जोशीबुवा, तुह्मीं हा जो चमत्कार करून दाखविला, त्यानें माझी उत्कंठा फारच वाढली आहे. आमच्या या गंगूच्या लग्नाचें कसें काय जुळतें याची बाई मला पराकाष्ठेची काळजी लागली आहे. कराल का ती दूर?

**धुरंधर**—भविष्य सांगण्याचें माझ्या हातीं आहे, काळजी दूर करण्याचें नाहीं.

**वाराणशी**—( एकीकडे ) हे मेले लागलीच हरभऱ्याच्या झाडावर चढतात! ( उघड ) हें पहा, तशी काळजी वाटायला मला कांहीं कारणें आहेत, अशांतला कांहीं प्रकार नाहीं हो! तुह्मीच सांगा, असें रूप आणि असा बांधा असल्यावर मला काळजी कां वाटावी? पण ह्मणतात ना

हृदय! त्यांतून कधीं कधीं साधारणच रूपाच्या पण नटव्या हलक्या कुळांतल्या पोरींनीं पुरुषांना मोह घातल्याच्या गोष्टी र येतात, त्यामुळेंहि जरा धास्ती वाटते. गंगू, चल ये बाई अशी गुवांच्या जवळ. ( गंगू येते. ) एवढेंसें चालूनसुद्धां थकलीसना? ाली बाई तुझ्या नाजूकपणाची! राजाच्या महालांतल्या गाद्या रुजामे देखील तुला बोंचायचे. हा घाम तरी किती आला आहे! निथळून गेलीस. जोशीबुवा, या नाजूक प्रकृतीमुळें माझ्या ा अभ्यासहि तितपत झाला नाहीं. त्रिवेणीसारख्या सामान्य पण न प्रकृतीच्या मुलींनींसुद्धां तिच्यावर यावें. यमुनेला मात्र तिनें कधीं ऊं दिलें नाहीं.

मुना—त्याला कारण माझाच हट्ट! गुरुजींनीं सांगितला एक धडा ला, कीं मीं दुसराच करावा!

ाराणशी—अलीकडे हिला शालूपैठण्यांचें ओझें सोसत नाहीं, न ही बारीक पातळ नेसते, आणि पोलके घालते. वेणी किंवा बुचडा ळा तर केंस आंवळ होतात ह्मणून ही आपले केंस असे मोकळेच वर राहूं देते. दागिन्यांपैकीं काय तो मोत्यांचा हारच तिनें आपल्या ांत राहूं दिला आहे.

यमुना—त्यांतलें इंगित आहे ठाऊक मला. धुरंधरमहाराजांना ी वस्तूंपेक्षां विलायती वस्तूंचीच आवड अधिक असायची. त्यांच्या ायती सदऱ्याच्या जोडीला चोळीपेक्षां हा पोलकाच चांगला शोभेल, णि त्यांच्या दाढीला हे मोकळे केंसच खुलून दिसतील.

गंगू—चल चावट कुठची!

यमुना—मी अशी दुसऱ्याकारितां आपल्या वस्त्रप्रावरणांत थोडाहि क करणार नाहीं. ज्याचें माझ्यावर प्रेम असेल, तो माझ्याकारितां त्यांज- हि प्रेमच करील. जो त्यांच्याकरतां मला सोडायला तयार होईल, त्याचें जवर प्रेम कसचें?

**धुरंधर**—धुरंधरमहाराजांवर यांचें मनापासून प्रेम दिसतें.

**वाराणशी**—तें कांहीं विचारूं नका. पोरीनें अलीकडे त्यांच्याकरितां जेवणहि टाकलें. सारखा त्यांचा ध्यास घेऊन बसली आहे. काय पोरीच्या नशिबीं आहे कुणाला ठाऊक !

**धुरंधर**—सत्य संकल्पाचा दाता तो नारायण आहे. बरें, पण इतकें प्रेम बसायला त्यांना यांनीं कुठें पाहिलें होतें कीं काय ?

**वाराणशी**—पाहणार कुठून ? त्यांचें चित्र आणि लोकांच्या तोंडचीं वर्णनें, यांनींच हिला वेड लाविलें आहे.

**धुरंधर**—मोठा चमत्कारच ह्मणायचा !

**यमुना**—पण आतां महाराज दाढीला रजा देतील, तेव्हां हिच्या प्रेमांत नाहींना फरक व्हायचा ?

**धुरंधर**—वा, यमुनाताई, तोंडांत केंसांचा फरक झाला ह्मणजे प्रेमांतहि केंसभर अंतर पडतें वाटतें ?

**गंगू**—इश्श ! यमुने, कांहींच्याबाहींच तुझी थट्टा ! हं, जोशीबुवा, पहातां माझा हात, कीं मी दूर होऊं ?

**धुरंधर**—(गंगूचा हात पहात स्वगत) कोणाचेंहि अनुकूल भविष्य सांगितलें ह्मणजे त्याजवर त्याचा पक्का विश्वास बसतो. (उघड) आयुर्मान बरेंच मोठें दिसतें.

**गंगू**—इश्श ! श्रीमंतांपेक्षां गरिबांनाच औक्ष अधिक असतें.

**यमुना**—जोशीबुवा, नुसतें मोठें आयुष्य ही कांहीं महत्त्वाची गोष्ट नाहीं. तें सुखाचें कीं दुःखाचें, हें पहिल्यानें कळलें पाहिजे.

**धुरंधर**—हो, हेंहि खरेंच. उत्तरध्रुवाच्या रात्रीपेक्षां भूमध्यरेषेवरील दिवस पुरविला. मातुःश्रीचें सुख बरेंच दिसतें.

**वाराणशी**—हातच्या कांकणाला आरसा कशाला ?

**धुरंधर**—पित्याचें सुख फारसें दिसत नाहीं.

**वाराणशी**—जोशीबुवा, तुम्हालाहि हें कळून आलें ना ? तें सुख नाहीं खरेंच हो ! खरें पाहूं गेलें तर अशा सोन्यासारख्या मुलीला चांगलें स्थळ मिळविण्याची त्यांनीं नको का हो खटपट करायला ? पण स्वभाव अगदींच आळशी आणि तुसडा पडला.

**धुरंधर**—बाईसाहेब, आपण आहांत तोंपर्यंत त्यांना कशाला काळजी वहायला पाहिजे ? आपण सगळें पहातच आहांत. यांचा विवाह राजघराण्यांत होण्याचा योग आहे.

**वाराणशी**—तुमच्या तोंडांत साखर पडो ! पण हें भाकीत जरा गुळमुळीतच झालें. राजाशीं लग्न होण्याचा कांहीं योग आहे का, हें स्पष्ट करूं द्या. नाहीं तर धुरंधरमहाराजांचे भाचे पार्थिवराजहि राजघराण्यांतीलच आहेत.

**धुरंधर**—तें तूर्त कांहींच सांगतां येत नाहीं. यत्नसाध्य आहे, हें मात्र खरें.

**वाराणशी**—यत्नसाध्य असेल तर त्याबद्दल खात्रीच आहे म्हटलें तरी चालेल. कारण आम्ही यत्न करायला कांहीं कमी का करणार आहोंत ? बाळ, अशी दूर हो आतां, आणि अशी हिरमुसली नको होऊंस गडे !

**धुरंधर**—आतां कोणाकोणाचा हात पहायचा राहिला आहे ? त्रिवेणीचा हात पाहूं ?

**वाराणशी**—तिचा काय हात पहायचा आहे ? असेल दहाजणींसारखा. आणि त्यांतून घरकाम करून तिच्या हाताला ओचकारेहि पडलेले असायचे. धड रेघा दिसायच्याहि नाहींत. (विचार केल्यासारखें करून) पण थांबा अं, पहाच तिचा हात. ( त्रिवेणी धुरंधराच्या पुढें बसते. धुरंधर तिचा हात पाहूं लागतो. ) त्रिवेणि, तुझा हात असा कांपतो आहे कां ? अशी भिऊं नकोस. तुला नवरा असा हुषार कारकून पाहून देऊं, कीं कुटुंबाचें पोट भरून दरमहा दोनचार रुपये मागेंहि टाकील.

**धुरंधर**—( एकीकडे ) हा हात किती स्निग्ध आहे, आणि हा चेहरा तरी लाजेनें किती मोहक दिसत आहे ! हिचीं हीं जाडींभरडीं वस्त्रें हिला कशींशींच दिसतात. तलम रेशमी वस्त्र ज्याप्रमाणें गोणपाटांत गुंडाळावें, त्याचप्रमाणें हिच्या नाजूक शरीराला बांड नेसविलेला आहे.

**वाराणशी**—हं, जोशीबुवा, तुह्मी तोंडाकडे फार वेळपहात राहिलांत ?

**धुरंधर**—हातावरून ज्या गोष्टीचा निर्णय करतां येत नाहीं, तिचा तोंडावरून कधींकधीं ताबडतोब करितां येतो.

**त्रिवेणी**—(एकीकडे) यांच्या हातांत हात दिल्यापासून मला जन्मांत लाधलें नाहीं इतकें सुख होत आहे; आणि असें वाटतें, कीं हाताप्रमाणें आपलें सारें जीवितहि यांच्याच स्वाधीन करावें; पण मला अभागिनीला हे विचार कशाला ? आज चार दिवस मी हे विचार दाबून टाकायला पाहतें आहें; पण संधि मिळतांच ते अगदीं उच्छृंखल झाले.

**धुरंधर**—हिला आईबापांचें मुळींच सुख मिळालेलें दिसत नाहीं.

**वाराणशी**—कुठून मिळणार ? लहानपणींच पोरकी झालेली ही पोर, आमच्या यजमानांनीं यात्रेला गेले असतां लांबची नातेवाईक ह्मणून जवळ बाळगिली, आणि पोटच्या लेंकराप्रमाणें वाढविली. हे उपकार ही कसे फेडते तें मात्र पहायचें आहे.

**धुरंधर**—( चपापून एकीकडे ) काय ? हिच्या हातावर राजचिन्हें !

**वाराणशी**—कां? चपापलेतसे? कांहीं वाईट दिसलें असेल तर चोरून ठेवूं नका.आमच्या त्रिवेणीला कांहीं वाटणार नाहीं.मोठी धीराची आहे हो !

**धुरंधर**—तसें नाहीं. ह्मटलें हिलाहि राजयोग आहे.

**वाराणशी**—हिला आणि राजयोग ? खास तुमची दृष्टि चकली ! हिला जर राजयोग तर आमच्या ह्माळसेला कां नसावा ? तुह्माला वाटतें, कीं आपण अजून गंगूचाच हात पहात आहोंत. अथवा तुह्मी ह्मणतां तेंहि खरें असेल; कारण आमची गंगू एकदां राणी झाली ह्मणजे

**धुरंधर**—( एकीकडे ) हा हात किती स्निग्ध आहे, आणि हा चेहरा तरी लाजेनें किती मोहक दिसत आहे! हिचीं हीं जाडींभरडीं वस्त्रें हिला कशींशींच दिसतात. तलम रेशमी वस्त्र ज्याप्रमाणें गोणपाटांत गुंडाळावें, त्याचप्रमाणें हिच्या नाजूक शरीराला बांड नेसविलेला आहे.

**वाराणशी**—हं, जोशीबुवा, तुह्मी तोंडाकडे फार वेळपहात राहिलांत?

**धुरंधर**—हातावरून ज्या गोष्टीचा निर्णय करतां येत नाहीं, तिचा तोंडावरून कधींकधीं ताबडतोब करितां येतो.

**त्रिवेणी**—(एकीकडे) यांच्या हातांत हात दिल्यापासून मला जन्मांत लाधलें नाहीं इतकें सुख होत आहे; आणि असें वाटतें, कीं हाताप्रमाणें आपलें सारें जीवितहि यांच्याच स्वाधीन करावें; पण मला अभागिनीला हे विचार कशाला? आज चार दिवस मी हे विचार दाबून टाकायला पाहतें आहें; पण संधि मिळतांच ते अगदीं उच्छृंखल झाले.

**धुरंधर**—हिला आईबापांचें मुळींच सुख मिळालेलें दिसत नाहीं.

**वाराणशी**—कुठून मिळणार? लहानपणींच पोरकी झालेली ही पोर, आमच्या यजमानांनीं यात्रेला गेले असतां लांबची नातेवाईक ह्मणून जवळ बाळगिली, आणि पोटच्या लेंकराप्रमाणें वाढविली. हे उपकार ही कसे फेडते तें मात्र पहायचें आहे.

**धुरंधर**—( चपापून एकीकडे ) काय? हिच्या हातावर राजचिन्हें!

**वाराणशी**—कां? चपापलेतसे? कांहीं वाईट दिसलें असेल तर चोरून ठेवूं नका.आमच्या त्रिवेणीला कांहीं वाटणार नाहीं.मोठी धीराची आहे हो!

**धुरंधर**—तसें नाहीं. ह्मटलें हिलाहि राजयोग आहे.

**वाराणशी**—हिला आणि राजयोग? खास तुमची दृष्टि चकली! हिला जर राजयोग तर आमच्या झाळसेला कां नसावा? तुह्माला वाटतें, कीं आपण अजून गंगूचाच हात पहात आहोंत. अथवा तुह्मी ह्मणतां तेंहि खरें असेल; कारण आमची गंगू एकदां राणी झाली ह्मणजे

ी आपलें वजन खर्च करून त्रिवेणीचें पार्थिवराजाशीं लग्न जुळवायला
ागेंपुढें पहाणार नाहीं. माझी बाळ मनानें मोठी उदार आहे. मग
ं औदार्य कोणाला दाखवावें आणि कोणाला दाखवूं नये, याचेंहि भान
तेला रहात नाहीं.

[ खंडेराव प्रवेश करितो. ]

**खंडेराव**—( स्वतःशीं ) तायताच्या पोरीचा ठावठिकाना आज-पोतुर लई जड लागत व्हता; पन त्येच्या बरूबर त्ये सोंगाड्याचा पत्त्या लावायाचं कामबी माज्याकड आलं, ह्ये लई ब्येस जालं. आता व्होव ततं घुसा, कोन त्योक बोलनार ? बरं, काय त्ये सोंगाड्याला ह्मनत्यात बरं? हं, तायत्या,—न्हव तोयत्या.

**वाराणशी**—यावें कोतवालसाहेब. कशी काय महाराजांकडची खबर ? खुशाल आहेत ना ?

**खंडेराव**—हैत ह्मनायच, न्हाइतर काय ?

**वाराणशी**—( भयानें ) ह्मणजे ?

**खंडेराव**—त्येंच्यावर जरा हाय परसंग.

**गंगू**—ह्मणजे ? बोला तरी लवकर !

**खंडेराव**—योक तोयत्या म्हाराजांची गादी अंगाखाली घालाया पगतुया. चेऱ्याह्मोऱ्यानं अक्षी म्हाराजावानीच दिसतुया ह्मनत्यात. त्येचा डाव फसवाया ह्माराजानीबी आपल्या भोवतालन अक्षी खडा प्हारा ठिवलाया.

**वाराणशी**—मग तुमची त्यांची गांठ पडली नाहीं ह्मणायची !

**खंडेराव**—ह्यो गडी त्येंची गांट घ्येतल्याबिगार येनार व्हय ! अव, गांटीचं काय, पन म्हाराज माज्यासंग दोन सबूद बोललबी !

**वाराणशी**—तें कसें काय ? सांगा सगळें आह्मांला.

**खंडेराव**—योक प्हारवाला माजा व्हता दोस्त. त्येला दिली जरा मदत.

**वाराणशी**—त्याची मदत घेतली ह्मणतां ?

**खंडेराव**—तसं न्हव. त्येला मदत दिली–पाजली. आन् जवा का त्यो गडी झिंगलाय तवा दिली त्येला झुकांडी, आन् जिन्यामंदी जाऊन ऱ्हायलो उबा; आन् जवा म्हाराज जिना उतराया लागल, तवा म्हनत्यात कस, “ कोनर त्यो हरामखोर उबा हाय ततं ? ” म्या जो म्हनता सूबाल्या हांकला, तो ह्ये शेरच गांटलं.

**वाराणशी**—वा:, महाराज चांगलेच गोड शब्द बोलले तुमच्याशीं !

**खंडेराव**—बोलल त सई !

**धुरंधर**—( एकीकडे ) काय गप्पीदास आहे पहा ! ( उघड ) तुह्मीं महाराजांना पाहिलें ह्मणतां, ते माझ्यासारखे दिसतात का ?

**खंडेराव**—( एकीकडे ) ह्ये मोटी पचाइत आलीया, पन् ह्यो मरद काय दाद द्येनार ह्येला ? ( उघड ) काय ह्मंटलसा ? तुमच्यावानी म्हाराज दिसत्याती म्हून ? न्हय दिसत्याती. दोगांचीं त्वांडं यकावानी येक. वाईच अंतर हाय बगा. त्येंचा मुखडा दिसतुया अक्षी मदन्यावानी, आन् तुमचं मुस्काट् दिसतया घुबडावानी !

**धुरंधर**—बरें, ऐट तरी ?

**खंडेराव**—त्येंची हाय मरदावानी, आन् तुमची हाय मुर्द्यावानी !

**त्रिवेणी**—(एकीकडे) काय मेला तोंडास येईल तें बरळत सुटला आहे !

**गंगू**—कोतवालसाहेब, तुमच्यासारख्या शिपाईगड्याचें बोलणें असतें जरा स्पष्ट. पण त्यांत तथ्य कांहीं कमी नसतें हो !

**धुरंधर**—बरें, कोतवालसाहेब, माझी अंगलट तरी त्यांच्यासारखी आहे का ?

**वाराणशी**—जोशीबुवा, उगीच कशाला आपल्याच हातानें आपला अपमान करून घेतां ?

**खंडेराव**—( एकीकडे ) कसा बोकांडी बसलाया बामन ! अजूनबी सोडीना. ( उघड ) अंगलट ह्मनतां न्हय ? त्ये काई बगाया नग. त्येंची हाय हत्तीवानी आन् तुमची हाय उटावानी.

·हें पहा, काय शोभा·राहिली ?
ाईसाब, तोयत्यासमंदानं काय बंदुबस्त कराया व्होवा,
ान् या गंगूताईस्नी आन् या यमुनाताईस्नीबी मला सांगा-
ांघा भलत्या मनुक्षाह्मोर सांगायचं वंगाळ. (एकीकडे )
ऽवल्याबिगार कसं व्हनार ?
-चला आपण तिकडेच जाऊं.

[ धुरंधर आणि त्रिवेणीशिवाय सर्व जातात.

स्वत:शीं ) मला नेहमीं तोंडदेखलीं मिठीं भाषणें ऐकायची
ईं कठोर भाषणेंहि नावीन्यामुळें कशीं गोड वाटत आहेत!
णीला जें दु:ख झालेलें दिसलें, त्यामुळें तर तीं भाषणें
प वाटलीं.
आपणाला फार वाईट वाटलें असेल, नाहीं !
तूं आहेसच का येथें उभी ? मला वाटलें, कीं मी अगदीं
.
·एकट्याला दुकटें असलें ह्मणजे दु:खांत सुख वाटतें, नाहीं ?
·आणि तुझ्यासारखी सांत्वन करणारी असली ह्मणजे
मयच होऊन जातें. या घरांतील सगळ्या माणसांनीं जरी
ान वाऱ्यानें माझ्या हृदयसमुद्राला हलवून सोडलें, तरी
ायुक्त शब्दच त्याचें शमन करण्याला समर्थ आहे. मला त्यांचा
राग येतो तो तुझ्यासाठीं. तुझ्यासारख्या गरीब गाईशीं
ासारखी करणी करायला त्या वाराणशीला लाज तरी कशी
?
—त्यांच्यावर असें रागावूं नये. त्यांनीं मला आजपर्यंत
ाटच्या मुलीसारखें केलें. अलीकडे मात्र मी कदाचित् गंगू-
ाच्या आड येईन, अशी शंका येऊन त्या मला बरें पाही-
त्या आहेत. त्यांना वाटतें, मी धुरंधरमहाराजांच्या दृष्टीस

पडलें, कीं ते गंगूताईस सोडून माझाच स्वीकार करतील. वास्तविक पाहिलें तर गंगूताई माझ्यापेक्षां कितीतरी श्रेष्ठ आहे! तिचें रूप कुणीकडे आणि माझें कुणीकडे! जमीनअस्मानाचें अंतर!

**धुरंधर**—तुमच्या रूपांमध्यें आहे खरें जमीनअस्मानाचें अंतर!

**त्रिवेणी**—पण तें काकूंना कुठून दिसणार? त्यांचें कितीहि झालें तरी आईचें हृदय. त्याला अशा हजारों नसत्या शंका आल्या तर नवल नाहीं. याबद्दल मला त्यांची कींव मात्र येते; राग मुळींच येत नाहीं. मला जरी देवानें आईच्या प्रेमाचा अनुभव येऊं दिला नाहीं, तरी त्याची योग्यता मी जाणून आहें. काकूंनीं गंगूताईच्या हितासाठीं माझें कितीहि नुकसान केलें, तरी मी त्यांना मनापासून क्षमा करीन.

**धुरंधर**—तुझ्या बोलण्यावरून कोणास असें वाटेल, कीं वाराणशीबाईंनीं तुला आजपर्यंत अत्यंत प्रेमानेंच वागविलें, आणि ह्मणून तूं त्यांचा इतका कैवार घेत आहेस. जों जों तुझे त्यांच्यासंबंधाचे उदारपणाचे उद्गार ऐकावे, तों तों त्यांच्याबद्दल कींव उत्पन्न होण्याऐवजीं संताप मात्र वाढत जातो. अशा देवमाणसाशीं अशी राक्षसी वर्तणूक? स्त्री पडली ह्मणून अधिक बोलतां येत नाहीं.

**त्रिवेणी**—तुह्मी काकूंकडे माझ्या दृष्टीनें पहाल, तर तुह्माला त्यांचा राग येणार नाहीं.

**धुरंधर**—तुझ्या दृष्टीनें पाहूं? तुझ्या दृष्टीनें जगाकडे पाहिलें, तर त्याला स्वर्गाचें स्वरूप येईल. तुझी दृष्टि कावळ्यास कोकिळ बनवील, आणि गारगोटीस हिरकणी करील. तुझ्या दृष्टीला जगांत स्वत:शिवाय वाईट असें काय दिसतें? तुला हा जो बांड नेसायला दिला आहे, तो तुला शालूप्रमाणेंच भासत असेल, नाहीं? त्रिवेणि, मला तुझ्या दृष्टीनें पाहतां येत नाहीं, याची क्षमा कर.

**त्रिवेणी**—त्यांना वाटतें, मला राज्याचा लोभ आहे. पण माझी इच्छा किती मर्यादित आहे, हें त्यांना कसें कळावें? धुरंधरमहाराजांशीं मी

लग्न करणार नाहीं, अशी शपथ जरी मीं वाहिली, तरी तें त्यांना खरें वाटणार नाहीं.

**धुरंधर**—आणि अशी भलती शपथ मी तुला घेऊंहि देणार नाहीं.

**त्रिवेणी**—(एकीकडे) एकूण यांची इच्छा मीं त्यांच्याशीं लग्न करावें अशीच दिसते. माझें दुर्दैव, दुसरें काय?

**म्हाळसा** ( प्रवेश करून )—अव जोशीबुवा, तुमाल्ही काकूबाय घरामंदी बिगीबिगी हटकत्याती.

[ धुरंधर जातो.

**त्रिवेणी**—( स्वतःशीं ) यांचें हृदय किती थोर आणि कोमल आहे हें! आमची उतावळी गंगूताई आणि तो मेला कोतवाल यांना नाहीं नाहीं तसें टाकून बोललीं! पण तें सारें विसरून यांनीं माझ्यासारख्या सामान्य मुलीच्या हेळणेबद्दल इतकी हळहळ दाखवावी, हें दुसऱ्या कशाचें लक्षण? यांनीं औदार्याच्या भरांत मीं राणी व्हावें, अशी देखील इच्छा दर्शविली; आणि मला राजयोग आहे हें भाकितहि हजार हिश्शांनीं यांच्या उदार इच्छेचेंच अपत्य असावें. माझी इच्छा तशी नाहीं, असें मीं यांना जीव तोडतोडून सांगितलें; पण तें यांना खरें वाटेना. महाराज, आपण दूरदूरच्या ग्रहांच्या गति अचूक सांगतां; पण माझ्यासारख्या अजाण मुलीच्या हृदयाचा ओघ कोणत्या दिशेला वहात आहे, हें मात्र आपणाला उमगूं नये ना? आपण गुरुत्वाकर्षणाच्या नियमांची मीमांसा करितां, पण हृदयाकर्षणाविषयीं आपलें इतकें अज्ञान असावें ना? आपल्या भाकितानें मला आनंद होईल असें आपणाला वाटलें; पण त्यानें माझा उलट हिरमोड मात्र झाला! मी राज्याकरितां इतकी हपापलेली आहें, असेंच आपणाला वाटतें ना? माझ्याबद्दल आपली इतकी हीन कल्पना असेल, तर मी आपल्या सेवेची इच्छा करितें, हें आपणाला कळल्यावर माझा आपणाला मनापासून राग येईल, नाहीं? पण मी दुर्लभ वस्तूची इच्छा करून मनाची अशी फसवणूक तरी कां करून घ्यावी? मला राज्ञीपद

जितकें दुर्लभ, तितकेंच त्यांचें गृहिणीपदहि आहे. चंद्राला हस्तगत करायची हांव न बाळगितां केवळ त्याच्या मधुर मूर्तीच्या दर्शनानेंच मनुष्याला जसा आनंद मानून घ्यावा लागतो, तसाच मलाहि त्यांच्या दर्शनमात्रानें मानिला पाहिजे. त्यांच्या दैवी प्रेमाची मला प्राप्ति झाली असती, तर माझ्यासारखी सुखी मीच असतें. पण माझ्या सुखाकरितां त्यांनीं आपल्या उच्च स्थानावरून ढळावें, हा विचार माझ्या निर्मल प्रेमाला मुळींच शोभण्यासारखा नाहीं.

[ जाते.

---

# अंक दुसरा.

## प्रवेश पहिला.

[ एकीकडून ह्माळसा व दुसरीकडून श्रीपति प्रवेश करितात. ]

**ह्माळसा**—( स्वतःशीं ) आखिरला ह्यो सिरपति माझा सोद काडीत हतं आलाच कीं. ह्येची माज्यावर अक्षी दांडगी पिरित हाय. ह्येला बगुनशानी माजा जीवबी लइ खुस झालाया. ह्येनं पोश्याकबी शिपाई-बान्याचा क्येला हाय. दिष्टबी लागायची येकांदी !

**श्रीपति**—ह्माळश्ये, मंगा मी आपल्या बासंगं या वाड्यामंदी आलों, आन् जवा तुला पगितली तवा भाईर उबा ऱ्हायलों. मनामंदी इचार क्येला, चारचौगामंदी तुला हटाकली मंजी तूं जायाचीस भिंगरीवानी पळून, आन् मंग मी काय तुज्यामागं भवऱ्यावानी धावाया लागूं ? तवा ह्मंटलं येकलीलाच गपकन् गाटावी. ह्माळश्ये, मला किती दी चुकावलस, पन आखिरला गाटलीच कीं ऱ्हाई तुला? तुजा ह्यो मुखडा बगाया म्या जीव कसा अक्षी हैरान क्येला व्हता !

**ह्माळसा**—आन् खंरर माज्यापायीं इक्ता येडा जाला व्हतास ?

**श्रीपति**—अक्षी तुज्या गळ्याच्यान्. ( तिच्या गळ्यास हात लावितो. ) तूं जवा तकडून निगून हकड आलीस, तवा मला कित्ती वंगाळ वाटलया म्हून सांगूं ? आपुन दोगं मिळून ऱ्होरी करायची; ढोरं पान्यावर न्येयाची, आन् शानगोटा करायचा; आन् तूं ग्येलीस तवापस्न मला काइबी ग्वाड लागना. तुजा ह्यो चेरा डोळ्याह्मोरनं जाईना आन् सबुद कानामदून हलना. मंग इचार क्येला, परान् ग्येला तरी भेत्तर; पन तुला

अच्चील तत्न हुडकुनशान् काडायची. तुज्या गळ्याच्यान्! (गळ्यास हात लावितो.)

**झाळसा**—आज लई गळ्याच्या आना व्हातुयास? आन् गळ्याला हातबी लावतुयास?

**श्रीपति**—झाळश्ये, माजी पिरित जिक्कीच्या तिक्ती हाय. पन तुजी मातुर सेरच्या वाऱ्यानं पार उडून ग्येलिया.

**झाळसा**—कशापायीं तूं ह्ये ह्मंतुस?

**श्रीपति**—ह्ये पग, तुज्या गळ्यांत ह्यो दागिना पल्डाया.आतां तुला माजा हात कसा ग्वाड लागनार? तुला ह्ये पाताळ लुगडबी मिळलया न्येसाया. मी गरीब गडी; माजी खादीची कांबरुनं तुज्या साडीह्मोरं कशी सोबल्याल?

**झाळसा**—अक्षी वंगाळ दिसत्याल ह्मंतोस? पगूं तर.

(श्रीपतीजवळ जाऊन उभी राहते. तो तिला जवळ ओढतो.)

**गंगू** (प्रवेश करून)—झाळसे, काय हा चावटपणा मांडला आहेस? बाबारे, तूं कोणीहि ऐस, पण असाच्या असा निघून जा पाहूं!

[श्रीपति जातो.

**गंगू**—झाळसे, तुला अशा गांवढळ माणसाशीं मैत्री करायला लाज वाटली पाहिजे.

**झाळसा**—ताईसाब, त्यो माजी साडी पगत व्हता.

**गंगू**—खोटी कुठची! साडी पहावयाला इतकें खेटून कशाला उभें रहायला हवें? तें कांहीं नाहीं, यापुढें तूं याला येऊं देतां कामा नये. राणीच्या दासीला हा अजागळ नवरा शोभेल तरी का? काय ती हेंगाडी भाषा, आणि गांवढळ रीतभात! काय तो अंगरखा,आणि काय तें मुंडासें! अंगाला आणि कपड्यांना घामाची कशी घाण मारते आहे! मनावर शिक्षणाचा कांहीं तरी संस्कार झाला आहे का? इश्श!

**झाळसा**—ताईसाब, मला लई सरम वाटातिया. येवडी चुकी जाली पगा. पुना त्येच्यासंग बोलल्यें तर ह्यो कान धरा.

**गंगू**—शाबास ह्मा‌ळसे, तूं आहेसच तशी शहाणी. आतां मन घट्ट कर, आणि त्याला पार विसरून जा.

[ जातात.

---

## प्रवेश दुसरा.

**पार्थिव**—( स्वगत ) या नगरांतील प्रत्येक उपवर मुलीला धुरंधर आपणाला पसंत करील अशी आशा वाटत आहे, त्यामुळें आह्मां इतर वरांकडे कोणी ढुंकूनहि पहात नाहीं. एकदां धुरंधराचें लग्न झालें, ह्मणजे या बहकलेल्या मुलींचीं डोकीं जरा ताळ्यावर येतील; आणि मग आमची त्यांच्याकडे दाद लागेल. तथापि तोंपर्यंत अगदींच माशा मारीत बसून उपयोग नाहीं. कारण तसा बसलों, तर धुरंधराच्या लग्नाची मजप्रमाणेंच वाट पहात बसलेलीं वररूपीं शेंकडों गिधाडें हताश झालेल्या वधूंस भराभर उचलून नेऊन मला हात चोळीत बसण्याचा प्रसंग आणणार! ह्मणून तात्कालिक यश येण्याचा संभव नसला, तरी पुढील आशेवर दुय्यम हक्कदार ह्मणून मला प्रेमाराधना चालू ठेविलीच पाहिजे. वधूवरील हक्काच्या दृष्टीनें जरी मी दुय्यम हक्कदार झालों, तरी वधूच्या हक्काच्या दृष्टीनें मी जामीनदारच ह्मणावयाचा! जर नेमलेल्या मुदतींत धुरंधरानें प्रेम वसूल केलें नाहीं तर तें वसूल करण्याचा हक्क मला प्राप्त होणार, व जर त्यानें त्या मुदतींत प्रेम दिलें नाहीं तर तें मला द्यावें लागणार, अशा प्रकारचा दुहेरी करार मला केला पाहिजे. पण हा करार करावयाचा कुणाशीं? या शहरांत हा करार करण्याची योग्यता गंगू आणि यमुना अशा दोघींनाच काय ती आहे. दोघीजणी माझ्या सहाध्यायिनी असल्यामुळें मला त्यांच्याशीं मोकळेपणानें बोलण्यास कांहीं हरकत पडणार नाहीं. दोघीजणी सुरेख असून हुषारहि आहेत. शिवाय दोघींच्या घरीं पैसा मुबलक आहे, आणि दोघींनाहि भाऊ नाहींत. कांहीं वेडेपीर श्रीच्या बळावर स्त्री हस्तगत करायला पहातात. पण मी तर स्त्रीच्या बळावर श्री आकर्षून

घेणार. तरुण लोक बहुधा अल्लड असायचे ! ते प्रेम करितांना मागचा पुढचा कांहींच विचार न करितां प्रेमाबरोबर वहात जातात, आणि त्यामुळें अखेरीला सपशेल फसतात. पण मी मात्र पक्का आहें ! मी इतर बाबतींप्रमाणें प्रेमांतहि पोक्त विचार करणार. जेथें पैसा असेल तेथेंच माझें प्रेम जडणार ! अधिक पैसा असेल तेथें अधिक निर्मल प्रेम, हें उघडच आहे. मीं निवडलेल्या दोन्ही मुलींच्या घरीं सारखीच संपत्ति असल्यामुळें माझें प्रेम दोघींवर सारखेंच निर्मल रहाणार. अरे, पण आपण बोलतां बोलतां विश्वेश्वरशास्त्र्यांच्या घरापाशीं येऊनहि पोंचलों. कायग, कोण आहे तिकडे ?

**म्हाळसा** ( प्रवेश करून )—मी हाय.

**पार्थिव**—जा, गंगूला म्हणावें कीं मी आलों आहें.

**म्हाळसा**—मी म्हंजी कोन ?

**पार्थिव**—मी म्हणजे तूं नव्हेस—मी म्हणजे पार्थिव.

**म्हाळसा**—मंग ह्ये अदुगर का न्हाई सांगितलं?(आंत जाऊन येते.) तुमास्नी ताईसाब आमंदी बुलावल्याती.

[ जाते.

[ पडदा उघडतो. गंगू एका आरशासमोर बसलेली दिसते. ]

**पार्थिव**—गंगू, तुझी वेणीफणी नुकतीच आटपलेली दिसते. सुंदर स्त्रिया जगद्विजय करण्याकरितां रंगभूमीवर जाण्यापूर्वीं रंगपटांत वस्त्राभरणांनीं कशा सज्ज होतात, हें पाहण्याचें फारच थोड्यांच्या नशिबीं असतें. त्या दैववानांपैकींच मी एक आहें खास. रसिक प्रेक्षकांना आपल्या रूपाचा प्रभाव दाखविण्यापूर्वीं स्त्रियांना त्या रूपाची ज्या निःपक्षपाती परीक्षकापुढें परीक्षा द्यावी लागते, तो हा आरसाहि अजून तूं दूर केला नाहींस. कटाक्षभ्रूविलासासारख्या चंचल साधनांनीं तरुणांचीं हृदयें चंचल करण्याच्या कामीं उपयोगी पडणारा हा आरसा भंगुर कांच व चंचल पारा यांच्या योगानें ज्या कारागिरानें घडविला, तो फारच मार्मिक असला पाहिजे. पण गंगू, या आरशाची



गंगू--तुह्मी माझ्या प्रेमाचे विषय? मीं कधींहि असें ह्मटलें नाहीं! [ पृष्ठ ५७. ]

मदत घेऊन तुझें सौंदर्य चारुतर करण्याला अवकाश तरी आहे का ? तूं शलाकेनें कितीहि कृष्ण कज्जल आपल्या पापण्यांस लाविलेंस, तरी त्यामुळें त्या काळ्याभोर दिसण्याऐवजीं उलट धूसर दिसूं लागतात. तुझ्या शुभ्र मानेस शोभा येण्यासाठीं तूं तिजवर जो शुभ्र मोत्यांचा हार लटकावून दिला आहेस, तो त्या मानेशीं तुलना करतांना इंद्रनील मण्यांच्या हाराप्रमाणें दिसत आहे. अधराला लाली आणण्याकरितां तूं जो तांबूल भक्षण केला आहेस, त्यानें त्या अधराला कालिमा मात्र आणिली आहे. ती कालिमा आपल्या ओष्ठांनीं धुऊन टाकण्याचा ज्याचा अधिकार असेल, त्याच्यासारखा धन्य तोच !

**गंगू**—पार्थिवराज, तुह्मीं अगदीं मिथ्या वर्णन केलेंत हें.

**पार्थिव**—तूं सांगण्यापूर्वींच त्या वर्णनाचें मिथ्यात्व मला दिसून आलें. कारण माझें वर्णन ऐकतांऐकतांच लज्जेनें तुझें शुभ्रवर्ण मुख आरक्त झालें, आणि तूं आपला अधर चावल्यामुळें त्याचा रक्त वर्ण पुन्हा आरूढ झाला.

**गंगू**—तुह्मीं हें जें वर्णन केलेंत तें जर खरें, तर माझ्या मनोदया-प्रमाणें सारें होईल असेंच मी समजूं ना ?

**पार्थिव**—तूं जी जी इच्छा करशील ती ती ताबडतोब पूर्ण होईल असें समज. हा दास तुझ्या सेवेला सदैव तत्पर आहे.

**गंगू**—पार्थिवराज, तुह्मी आपल्या बाळपणींच्या स्नेहाला जागलेत खरे ! मग कराल का माझी कामगिरी ?

**पार्थिव**—कामगिरी ? कामगिरी कोणती करायची आणखी ?

**गंगू**—माझ्या मनांत जें अतुल प्रेम वास करीत आहे, तें त्याच्या विषयापर्यंत पोंचवाल का ?

**पार्थिव**—तुझ्या प्रेमाचा विषय मजशिवाय कोण असणार ?

**गंगू**—तुह्मी माझ्या प्रेमाचे विषय ? मीं कधींहि असें ह्मटलें नाहीं !

**पार्थिव**—ह्मणायलाच कशाला हवें ? तुझ्या तोंडावर तें प्रेम दिसत होतें.

**गंगू**—माझ्या तोंडावर जर तुमचा विश्वास असेल, तर मी त्याच तोंडानें साफ सांगतें, कीं मला असा चहाटळपणा खपणार नाहीं ! धुरंधर-महाराजांबरोबर स्वतःस बसवून घेतांना आपणास लाजहि वाटली नाहीं ! आज कांहीं अमली पदार्थ प्यायलां नव्हतां ना ?

**पार्थिव**—जरा प्यायलों होतों खरा. तुझ्या रूपापेक्षां अधिक अमली पदार्थ कोणता असणार ? मला क्षमा कर. मी याच पावलीं चाललों पहा.

[ जातो.

**गंगू**—झाळसे, त्या जोशीबुवांना इकडे घेऊन ये पाहूं.

**झाळसा**—जी सरकार. ( आंत जाऊन धुरंधरासह प्रवेश करते. )

**गंगू**—जोशीबुवा, आपणास कां बोलाविलें हें आपणासारख्या त्रिकालदर्शी पुरुषांना सांगावयास नकोच. आपण काल ह्मणालांत, मला राज्ञीपद यत्नसाध्य आहे ह्मणून. त्याचा काय अर्थ ?

**धुरंधर**—त्याचा अर्थ इतकाच, कीं तें पद मिळविण्याकरितां प्रामाणिकपणाचा प्रयत्न झाला पाहिजे. तो करितांना कोणासहि फसवितां उपयोगी नाहीं, आणि स्वतःस तर मुळींच फसवितां कामा नये. तुमचें प्रेम धुरंधरमहाराजांवर आहे असा जो तुह्मीं ग्रह करून घेतला आहे, तो निखालस चुकीचा आहे. धुरंधरमहाराज आजपर्यंत विलायतेंत होते, आणि तुह्मी त्यांच्यापासून हजारों कोसांच्या अंतरावर; असें असतां तुमचें प्रेम त्यांच्यावर बसतें याचा अर्थ काय ? त्यांचें चित्र पाहून तुमचें प्रेम जडलें असें ह्मणावें, तर मजवरहि तुमचें प्रेम कां जडूं नये ? कारण कोतवालांनीं तुह्माला कांहीं जरी खोटेंनाटें सांगितलें असलें, तरी खरी गोष्ट अशी आहे, कीं माझ्या आणि धुरंधरमहाराजांच्या चेहऱ्यांत विलक्षण साम्य आहे; आणि या प्रकारचे उद्गार आजपर्यंत हजारों लोकांनीं काढिले आहेत. धुरंधरमहाराजांच्या गुणांवर तुह्मी लुब्ध झालांत नें ह्मणावें, तर त्यांचे कोणते गुण आजपर्यंत तुमच्या नजरेस आले ? माणें इतरांचेंहि गुणवर्णन तुमच्या कर्णपथावर आलें असलें त्यांजवर नाहीं अजून तुमचें प्रेम जडलें ? त्यांच्यापेक्षां माझेच



त्रिवेणी—मीं स्वतःच खून केला असतांना शंका कां वाटूं नये ? [ पृष्ठ १६१. ]

गुण तुह्माला आधिक्यानें दिसले आहेत. मग माझ्यावर कां नाहीं तुमचें प्रेम जडत ? याचें कारण एकच. धुरंधर राजा आहे, आणि मी कंगाल आहें. धुरंधरराजावर तुमचें प्रेम आहे, धुरंधरावर नाहीं. प्रेम जडतें तें अनेक कारणांमुळें जडतें. उदार अंतःकरण, असाधारण बुद्धि, अलौकिक विद्वत्ता, असामान्य पराक्रम, मनोरम सौंदर्य, मोहक वक्तृत्व हे प्रेमाचे सामान्यतः विषय होत. जों जों विषय गूढ तों तों प्रेमाची गाढता अधिक. परंतु तुमचें राज्यासारख्या सर्वांत बाह्य व आगंतुक अशा विषयावर प्रेम जडलें आहे. हें प्रेम धुरंधरावर आहे असा जो तुमचा समज आहे तो दूर करा, आणि त्याजवर निर्मल व अकृत्रिम प्रेम ठेवा; ह्मणजे तुह्माला खास यशःप्राप्ति होईल. खऱ्या प्रेमानें देवसुद्धां वश होतो, मग धुरंधर काय मनुष्यच आहे!

**गंगू**—काल कोतवालांनीं चालविलेल्या उपहासांत मी मिळालें, ह्मणूनच तुह्मी मला ही शिक्षा देत आहांत. माझ्या प्रेमाच्या मुळाशीं स्वार्थ नसून तुमच्या या उपदेशाच्या मुळाशीं मात्र आहे. धुरंधरमहाराजांची व तुमची योग्यता एकच, असा जर तुमचा समज झाला असेल, तर तो साफ चुकीचा आहे.

**धुरंधर**—माझी स्पष्टोक्ति आईबापांच्या कानांवर घालून तुह्माला त्यांजकडून मला दंडहि करवितां येईल, हें मी जाणून आहें.

**गंगू**—या गोष्टीचा बभ्रा झाल्यानें मजकडेच कमीपणा येणार आहे, ह्मणून मी तो करणार नाहीं अशाबद्दल खात्री असूं द्यावी.

[ जातात.

---

## प्रवेश तिसरा.

[ पार्थिव आणि यमुना. ]

**पार्थिव**—( स्वगत ) काल गंगूकडे जी फजिती झाली, ती माझ्या उतावळेपणानेंच झाली. यमुनेपाशीं जी प्रणययाचना करावयाची,

ती धिमेपणानें केली पाहिजे. तिनें आपलें मत स्पष्टपणें दाखविल्याखेरीज आपण निश्चयात्मक असें कोणतेंच धोरण स्वीकारावयाचें नाहीं. ( उघड ) यमुने, काय चाललें होतें ?

**यमुना**—या शहरांत आज हजारों उपवर मुली जमल्या आहेत. त्यांतली सर्वांत सुंदर कोण, याचा विचार करीत होतें.

**पार्थिव**—मग याचा इतका वेळ विचार करीत कशाला बसलें पाहिजे? माझ्यासारख्या मार्मिकाला हें कोडें उलगडायला मुळींच वेळ नको.

**यमुना**—इतका मार्मिकपणा सर्वांनींच कुठून आणायचा ?

**पार्थिव**—मार्मिकपणा जरी असला, तरी हें कोडें सुंदर स्त्रियांनीं उलगडण्याच्या मार्गांत कांहीं तशाच अडचणी आहेत. या शहरांतील सर्वांत रमणीय स्त्री जरी घेतली, तरी ती स्वतःस आरशाशिवाय दिसणारच नाहीं; आणि आरशांत पाहणारास आपलें अकृत्रिम रूप जसेंचें तसेंच कधींच दिसत नाहीं ! एकतर नथ, गालावरील तीळ, लुगड्याचा पदर उलट बाजूस दिसून मनोभंग करितात. शिवाय ज्याप्रमाणें छायाचित्र काढवितांना मनुष्य उसनी ऐट आणून तोंडावर खोटें हास्य धारण करितो, त्याप्रमाणें सुरूप स्त्रिया आरशासमोर आपल्या मुखावर कृत्रिम सौंदर्य आणण्याचा प्रयत्न करितात; आणि त्यामुळें आपलें स्वाभाविक सौंदर्य त्यांना पहावयास मिळत नाहीं. सर्वांत स्वाभाविक अवस्था निद्रेची असते. त्या अवस्थेंत स्त्रीचे केंस बागेंतील लतांप्रमाणें कृत्रिम स्थितींत नसून वनलतांप्रमाणें इतस्ततः विखुरलेले असतात, अवयवांचा ताठा जाऊन त्यांच्या जागीं शैथिल्य आलें असतें, व मुखावरील लावण्यदर्पाची छाया जाऊन तिच्या ठिकाणीं भोळेपणा आणि लाडकेपणा दिसत असतो. विशेषेंकरून निद्रावस्थेंत रमणीस आपल्या वल्लभाचें स्वप्न पडत असलें म्हणजे तिच्या मुखावर जें तेज विलसत असतें, तें अनिर्वचनीय आहे. पण हें तेज पहाण्याचें तिच्या नशिबीं मात्र नसतें. अत्यंत कुरूप माणसालाहि तें यत्नानें पाहतां येईल. पण या अनुपम सौंदर्याच्या मालकि-

णीला मात्र वर्णनावरच आपली तहान भागवून घेतली पाहिजे. पाण्यांत राहून मासा कोरडाच !

**यमुना**—पण या सगळ्याचा माझ्याशीं काय संबंध ?

**पार्थिव**—यमुने, तुला सगळें कळून चुकलें आहे. रूपवतींना आपल्या रूपाचा प्रभाव किती आहे, हें इतरांच्या पूर्वींच कळून चुकलेलें असतें. सद्गुण विनयानें जसा खुलून दिसतो, त्याप्रमाणें रूपहि रूपवतीच्या त्याविषयींच्या अज्ञानानें विशेष खुलून दिसतें, हें माहित असल्यामुळें सुंदर पण चतुर स्त्रिया अंगीं खोटा विनय धारण करीत असतात.

**यमुना**—तर मग हें सारें वर्णन माझेंच होतें असें मी समजूं ?

**पार्थिव**—तुझ्याशिवाय या वर्णनावर दुसऱ्या कोणाचा हक्क चालणार आहे ? तुझें सौंदर्य इतर स्त्रियांच्या लावण्याहून अधिक मनोहर दिसायला आणखी एक गोष्ट तुजपाशीं आहे.

**यमुना**—कळूं तरी द्या ती कोणती ती ?

**पार्थिव**—तुझा हट्ट.

**यमुना**—हट्टानें माझ्या रूपांत भर ती कशी पडणार बाई ? आज तुह्मी विरोधाशिवाय बोलतच नाहीं.

**पार्थिव**—सांगतों कशी ती. कोणतीहि वस्तु दुःसाध्य असली ह्मणजे तिचें जितकें मूल्य वाटतें, तितकें अन्यथा वाटत नाहीं. हट्टी स्त्री इतरांपेक्षां दुर्लभच वाटावयाची.

**यमुना**—तुह्माला माझा हट्टहि गुणासारखा वाटूं लागला, हें एका अर्थीं बरें झालें. कारण माझ्या अंगीं हट्टाशिवाय आणखीहि बरेच दुर्गुण आहेत. ते सगळे जर माझ्या रूपांत भर टाकूं लागतील, तर तुह्मी ह्मणतां त्याप्रमाणें मी सर्वांत सुंदर खरी !

**पार्थिव**—सगळ्या दोषांमुळें रूपांत भर पडते, असें माझें ह्मणणें नाहीं. तर ज्या दोषांनीं सुंदर युवतीच्या स्वरूपांत क्षणोंक्षणीं मनोहर विकार दृग्गोचर होतात, त्या दोषांमुळेंच कायती भर पडते. भ्रुकुटि, नेत्र, गाल,

ओंठ, हनवटी या विकारी अवयवांची भिन्न भिन्न रचना हीच जर सौंदर्याचें सर्वस्व असेल, तर ती रचना ज्या ज्या मनोविकारामुळें घडून येत असेल तो तो नीतिदृष्ट्या कितीहि त्याज्य असला, तरी रूपरसिकाच्या दृष्टीनें इष्टच असतो. मग तो हट्ट असो, क्रोध असो किंवा उपहास असो.

**यमुना**—मी जर सर्वांत सुंदर, तर गंगूताईची वाट काय ?

**पार्थिव**—तिला लोक सुंदर ह्मणोत, पण मी ह्मणणार नाहीं. नासिका, भिंवया, कान, हनुवटी हे अवयव अमुक अमुक अंगुळें असले तरच ते सुरेख, अशी जर सौंदर्याची व्याख्या असती, तर गंगू सुरेख असती खरी! पण वास्तविक पाहतां अवयवांची लांबीरुंदी मोजण्याइतकें व ती टिपून ठेवण्याइतकें भान रसिकाच्या ठायीं राहतें, तर तें सौंदर्य कसचें ? त्याच्या मनावर रूपाचा परिणाम होतो, तो पृथक्त्वानें होत नसून समवायानें होत असतो.

**यमुना**—मला हें ऐकून फार समाधान वाटलें. तर मग तुह्मी गंगूताई-पाशीं प्रेमभिक्षा कधींच मागणार नाहीं ह्मणतां ?

**पार्थिव**—कधीं मागितली नाहीं, आणि यापुढें मागणारहि नाहीं.

**यमुना**—हें ऐकून मला फार आनंद वाटत आहे.

**पार्थिव**—( एकीकडे ) मीं आपल्या वक्तृत्वानें हिच्या हृदयावर पूर्ण जय मिळविला, यांत शंका नाहीं. (उघड) इतका आनंद होण्याचें कारण ?

**यमुना**—कारण कांहीं मोठेंसें नाहीं. तुह्मी येण्यापूर्वीं मी आणि गंगूताई दोघींपैकीं अधिक सुरेख कोण, अशाबद्दल वाद करीत होतों. तुह्मी तिच्याकडे मागणी करायला गेलां होतां, असें तिच्या बोलण्यांत आलें. इतक्यांत तुह्मी आलांत; तेव्हां मी तिला या दाराच्या आड बसवून इकडे आलें. आतां तुमचें बोलणें मजप्रमाणें तिनेंहि ऐकलें असेल; आणि ती माझ्यापेक्षां कमी सुरेख असून वर खोटीहि आहे, हें तिचें तिला कळूनहि आलें असेल. थांबा, मी तिला इकडेच बोलावितें.

**पार्थिव**—(एकीकडे) घात झाला ! सर्वस्वीं फसलों ! (उघड) यमुने, मला एका स्नेह्याला या घटकेला—नव्हे, या क्षणीं भेटायला गेलें पाहिजे. तुझ्याशीं बोलतांना मला त्याची आठवणच नव्हती. जातों मी—

**यमुना**—चार पळांनीं काय होतें ? जरा थांबा.

**पार्थिव**—छे, क्षणभरहि थांबायची सोय नाहीं.

[ घाईघाईनें निघून जातो.

**यमुना**—( स्वगत ) प्रेमयाचना जिकडून व्हावीशी वाटते, तिकडून न होतां भलतीकडून झाली ह्मणजे हें असें कपाळ दुखूं लागतें.(पडद्याकडे पाहून उघड ) अग, त्या पलीकडल्या खोलींत भार्गवराव असतील,त्यांना पाठवून दे पाहूं. (भार्गव प्रवेश करितो.) यावें, गंगूताई !

**भार्गव**—ह्मणजे ? झालें काय ?

**यमुना**—दुसरें कांहीं नाहीं. ज्याच्या हृदयांत प्रेमाचा अंशहि नाहीं, असा एक बोलका भाट इतक्यांत मजकडे येऊन गेला.त्याला मीं सांगितलें, कीं पलीकडच्या खोलींत गंगूताई बसली आहे.आपण तिकडूनच आलांत; ह्मणून त्या नांवानें हांक मारिली, इतकेंच काय तें !

**भार्गव**—आपण स्त्रिया असतों तर किती चांगलें झालें असतें, असें मजप्रमाणें दुसऱ्याहि पुरुषांना वाटत असलें पाहिजे. कारण तुह्मी स्त्रिया आपल्या मैत्रिणींशीं जशा मोकळ्या मनानें वागतां, तशा आमच्याशीं मुळींच वागत नाहीं. बरें, मला बोलाविलें कशाला ?

**यमुना**—त्या भाटाच्या बडबडीनें जरा मस्तक दुखूं लागलें. आपणाला मस्तकाच्या निरनिराळ्या भागांचें चांगलें ज्ञान आहे, असें ऐकतें; तेव्हां माझा मस्तकशूळ शांत करण्याच्या कामीं आपला उपयोग झाला तर पहावा, ह्मणून तसदी दिली.

**भार्गव**—तसदी कसली ? यांत मला आनंदच आहे.पण मला जें ज्ञान आहे,त्यानें कपाळदुखी बरी करितां यावयाची नाहीं. मस्तकाच्या कोणत्या

भागांत कोणत्या मन:शक्तीचें वास्तव्य आहे, आणि ती शक्ति किती परिणत झाली आहे, एवढेंच कायतें मला सांगतां येईल.

**यमुना**—तें कसें, याचा जरा उलगडा झाल्याशिवाय मला कळणार नाहीं.

**भार्गव**—हें पहा, तुझ्याच मस्तकाची स्थिति आपण पाहूं या. (तिच्या डोक्यावर हात ठेवून) हा पहा पूज्यबुद्धीचा भाग. तुझ्या डोक्यांत पूज्य-बुद्धीच्या नांवानें जवळजवळ पूज्यच आहे! हें महत्त्वाकांक्षेचें क्षेत्र. याचीहि जवळजवळ तीच दशा.

**यमुना**—हें मात्र अगदीं खरें. मला जरी कोणीं हें राज्य दिलें तरी नको.

**भार्गव**—तें मला माहीत आहे. हें हट्टाचें राज्य. यानें मारे धुमाकूळ माजविला आहे. तूं एकदां ज्याचा नाद घेशील, तो तडीला नेल्याशिवाय सोडणार नाहींस. तुझ्यापुढें इतरांची मात्रा मुळींच चालणार नाहीं.

**यमुना**—हें खरें ना पण? आपल्याहि हें लक्षांत असूं द्या.

**भार्गव**—हें व्यवहारज्ञान रगड आहे. हा कारस्थानीपणा; भरपूर आहे.

**यमुना**—मी नाहीं जा आतां पाहूं देत. आपण माझ्या डोक्याचें अगदीं पृथक्करणच चालविलें आहे. तरी पण एक गोष्ट अजून आपल्या लक्षांत आली नाहींच.

**भार्गव**—ती कोणती?

**यमुना**—पुढें कधीं तरी सांगेन.

**भार्गव**—यमुने, स्त्रियांच्या गालांत जर एखाद्या मन:शक्तीचें वास्तव्य असतें तर या शास्त्राचें हजारों पुरुषांनीं अध्ययन केलें असतें; आणि त्या शक्तीचा अंदाज करण्यांत किती तरी वेळ घालविला असता.

**यमुना**—गालांत कल्पनाशक्ति नसते का?

**भार्गव**—मुळींच नसते.

**यमुना**—मग कपोलकल्पित हा शब्द कसा निघाला?

—तो नुसता अलंकार आहे. इतर अवयवांना अलंकार अस-
प्रमाणें गालाला नसतो; ह्मणून कवींनीं त्याजवर हा अलंकार
आहे झालें.

—मला जर आपणाप्रमाणें मन ओळखण्याची कला अवगत
र तिचा मला या घटकेस चांगलाच उपयोग करून घेतां आला

—तो कसा?

—आपण अलीकडे फार चिंतातुर दिसतां. आपल्या चिंतेचें
ळण्याचें साधन मजपाशीं असतें, तर चांगलें झालें असतें.

व—माझ्या चिंतेची तुला वांटेकरीण करावी कीं नाहीं, याच
सध्यां मी आहें. ती चिंता दूर होण्याला तुझें झालें तर बरेंच
होईल.

ना—मग सांगाच तर तिचें कारण.

वि—मी एका मुलीच्या शोधांत आहें. तिचा पत्ता होईल तितक्या
लागला पाहिजे.

ना—( एकीकडे ) मला वाटलेंच असें कांहीं तरी असेल ह्मणून.
) तिचें नांव गांव तरी माहीत आहे का? निदान एखादी खूण?

र्गव—तिच्या गळ्यांत एक जस्ती ताईत आहे.

ना—(एकीकडे) हे उघड उघड त्रिवेणीबद्दलच बोलत आहेत.
गळ्यांतील ताईत दिसायला स्वारीनें तिला बऱ्याच बारकाईनें
न पाहिलेलें दिसतें. पण असें करायला यांना कुठें बरें अवसर
ळ असावा? यांना तर तिचा सारखा ध्यास लागलेला दिसतो.
तिलाहि यांचा लागलेला आहे कीं काय? पाहिलें पाहिजे. बरें झालें,
एच कळलें. (उघड ) पाहीन मी शोध करून.

र्गव—पुरुषांपेक्षां बायकांनाच हा पत्ता लवकर लागायचा. याशि-
आणखी एक लहान काम आहे. तुझें विश्वेश्वरशास्त्र्यांच्या वाड्यांत

बरेंच जाणें येणें आहे, आणि तुझ्या अंगीं एखाद्या मुत्सद्यास शोभणारा कारस्थानीपणाहि आहे; तेव्हां तुला तें काम फारच सोपें जाईल.

**यमुना**—अशानें कांहीं मी हरभऱ्याच्या झाडावर चढायची नाहीं. कळूं द्या कोणतें काम तें ?

**भार्गव**—त्या वाड्यांत हल्लीं एक ज्योतिषी उतरला आहे.

**यमुना**—आहे ठाऊक. त्याचा काय संबंध ?

**भार्गव**—तो आहे माझा निस्सीम मित्र. तरी पण त्याचा एक मोठा दोष मला सांगितला पाहिजे. तो आहे जरा रंगेल. त्याचें जर वाड्यांतल्या एखाद्या मुलीवर प्रेम बसलें, आणि त्याच मुलीची जर धुरंधरमहाराजांनीं निवड केली, तर माझा मित्र हताश होऊन प्राणत्याग करील.

**यमुना**—( एकीकडे ) मित्रधर्माला चांगलेंच जागणें चाललें आहे ! त्रिवेणीविशाय गंगूताईवरहि स्वारीचा डोळा दिसतो. ( उघड ) तर मग माझी कामगिरी इतकीच ह्मणतां, कीं त्या ज्योतिष्याविरुद्ध गंगूताईचें मन बिघडवून टाकावयाचें ?

**भार्गव**—तूं चतुरच आहेस. मी तें आणखी काय सांगणार तुला ?

**यमुना**—बरें, मीं त्या मुलीचा शोध लावून दिला तर मला बक्षीस ?

**भार्गव**—तुजवर प्राणांपेक्षांहि जास्त प्रेम करील—

**यमुना**—कोण ?

**भार्गव**—असा एक वर मीं तुजकरितां निवडून काढिला आहे, तो तुला अर्पण करीन.

**यमुना**—माझ्या उठाठेवी दुसऱ्यांनीं नको करायला ! मी आहें खंबीर स्वतःचें हित पहायला.

**भार्गव**—बरें, ठरलें तर मग ?

**यमुना**—त्याची नको काळजी तुह्माला.

[ जातात.

## प्रवेश चवथा.

[ विश्वेश्वर आणि वाराणशी. ]

**वाराणशी**—मी काय ह्मणतें इकडे लक्ष आहे ना ? ही डोक्यावर घेतलेली पोरच उद्यां राणी होऊन आपल्या डोक्यावर मिरीं वाटायला लागणार ! आपला स्वभाव असेल थंड; पण माझा नाहीं, साफ सांगतें. मला हें कांहीं खपणार नाहीं. आजवर तिला खायला, प्यायला, नेसायला दिलें, वाटेल तसे लाड केले, ते स्वतःच्या पायावर धोंडा पाडून घ्यायला कीं काय ? मी आपणाकडून आपणाला हजार वेळ सांगितलें, कीं ही सुस्ती बरी नाहीं ह्मणून ! सुस्ती सुस्ती अशी करायची तरी कुठवर ? तिला कांहीं सुमार ? घराला आग लागली, तरी ह्मणे बिछान्यापर्यंत नाहीं आली अजून ! कशी झाली तरी ती आपली पोटची लेंक. तिची काळजी आपणांलाच वाहिली पाहिजे. पण स्वतःच्या ऐषआरामापुढें तिची काळजी करतो कोण ? नेहमीं झोंप, झोंप, झोंप ! ही पहा आतांहि झोंपच चालली आहे. ( विश्वेश्वरशास्त्र्याचें डोकें हलविते. ) छेः बाई, भारीच पण ऐदीपणा हो ! इकडून तिकडे पहायचें झालें, तरी गड्याला ह्मणाल माझें तोंड दुसरीकडे फिरीव ह्मणून !

**विश्वेश्वर**—झोंप घेऊन माझें नुकसान तें काय झालें ?

**वाराणशी**—ह्मणजे ? मी इतला वेळ गप्प होतें वाटतें अगदीं ?

**विश्वेश्वर**—तूं असतेस केव्हां गप्प तर आतांच असशील ?

**वाराणशी**—ह्मणजे माझी सारखी टकळी चालली असते, असेंच ना ? बरें, तसेंच का होईना. त्या टकळीपैकीं तुह्मीं किती शब्द ऐकले ?

**विश्वेश्वर**—तुझें सारें चऱ्हाट ऐकण्याची मुळींच जरूर नसते. कथेप्रमाणें तुझें पुन्हा पुन्हा तेंच पालुपद येतें, त्या वेळीं मी जागा असलों ह्मणजे झालें. शिवाय ज्याप्रमाणें अंगाईच्या सुरावर तान्ह्या बाळाला गाढ झोंप येते, तशी तुझ्या टकळीच्या सुरावर मलाहि येते.

**वाराणशी**—वा, अगदीं कुक्कुबाळच किनई! बरें आहे. घ्या झोंप तुह्मी. ती कारटी त्रिवेणी राणी होऊन अंमल चालवायला लागली, ह्मणजे आपोआपच तुमच्या झोंपेचा अंमल उडेल!

**विश्वेश्वर**—त्रिवेणी झाली तरी ती आपल्या मुलीसारखीच नाहीं का? तिचें सुख तें आपलेंच सुख ह्मणायचें!

**वाराणशी**—असला हा पांचट वेदांत मला नको आहे! ह्मणे तिचें सुख तें आपलेंच सुख. तुह्मी ह्मणतां हें जर खरें, तर मग ती गिळते तें तुह्मींच खाल्ल्यासारखें नाहीं का होत? मग जेवण कशाला पाहिजे? जेवणाची गोष्ट निघाली, कीं सारें ब्रह्मज्ञान लटपटतें!

**विश्वेश्वर**—बरें, ह्मणणें काय तुझें?

**वाराणशी**—तिला घरांतून काढून द्या.

**विश्वेश्वर**—काय ह्मणतेस? तिला काढून लावूं? आजपर्यंत एखाद्या ठेवीप्रमाणें तिचें रक्षण करून अखेरीस तिचा विश्वासघात करूं? मी थंड प्रकृतीचा आहें खरा; पण तत्त्वावर गोष्ट आली ह्मणजे माझ्यासारखा हट्टी मनुष्य तुला सांपडणार नाहीं. मी साफ सांगतों, कीं तिला घराबाहेर काढण्यापेक्षां दुसरें कोणी निघून गेलें तरी मला पत्करेल.

**वाराणशी**—मग मला निघून जायला स्पष्टच कां नाहीं सांगत? देवारे देवा! कोण ही छळणूक! यापेक्षां डोळे कां नाहीं झांकत?

**विश्वेश्वर**—डोळे झांकायची माझ्याप्रमाणें तुलाहि इच्छा झाली तर? आतां तरी माझ्या डोळेझांकीकडे डोळेझांक करशीलना?

**वाराणशी**—माझा चालला आहे प्राण, आणि तुमचा होतो आहे खेळ! कुणीकडून आपल्याशीं माझी गांठ पडली देव जाणे!

**विश्वेश्वर**—या बाबतींत मात्र तुझें माझें मत अगदीं तंतोतंत जुळतें! आपली जन्माची गांठ पडली नसती, तर मलाहि तुजप्रमाणेंच समाधान झालें असतें. पण करणार काय? आपल्या लोकांत अल्पस्वल्प आणि तात्पुरत्या महत्त्वाच्या गोष्टी असतात मनुष्याच्या हातांत; पण लग्ना-

सारखी जन्मभर पुरणारी गोष्ट मात्र हातीं नसते. तुझे वडील माझ्या वडलांना भेटले; त्यांनीं कागदाच्या एका चिटोऱ्याची दुसऱ्या चिटोऱ्याशीं तुलना केली; तुझ्या वडलांनीं हुंडाकरणी कबूल केली, ती माझ्या वडलांना पसंत पडली; आणि अखेरीस तुला आणि मला जन्मभर झगडण्याकरितां विवाहरज्जूंनीं घट्ट आंवळून बांधलें. आगगाडीच्या डब्यांत बसणारांची जशी परस्परांशीं ओळख नसते, तशी तुझी माझीहि नव्हती. पण आगगाडीचा प्रवास असतो थोड्या पल्ल्याचा, आणि आपला आहे जन्माचा!

**वाराणशी**—मग नाहींना माझें ऐकायचें ?

**विश्वेश्वर**—हें पहा, जर त्रिवेणीला घरांतून काढून लाविलें, तर ती आयतीच धुरंधरमहाराजांच्या दृष्टीस पडायची! तेव्हां याहि दृष्टीनें तसें होणें श्रेयस्कर नाहीं.

**वाराणशी**—हो, हें नव्हतें माझ्या ध्यानांत. बरें, तिला वनभोजनाच्या निमित्तानें आह्मीं जर आपल्या आरामबागेंत नेली, आणि तिला तशीच तेथें ठेवून आह्मी कोणत्या तरी निमित्तानें तिच्याशिवाय परत आलों आणि गंगूचें लग्न होईपर्यंत तिला घरीं आणलेंच नाहीं, तर तें तरी आपल्या मनास येईल का ?

**विश्वेश्वर**—(एकीकडे) मला तरी तेंच पाहिजे होतें.(उघड) वा:, सर्वोत्कृष्ट युक्ति काढलीस. पण तिच्याबरोबर आरामबागेंत कुणास ठेवायचें ?

**वाराणशी**—आपले जोशीबुवा राहतील. खरें विचाराल, तर तिचें त्यांच्याशीं लग्न झालें तरी मला त्यांत कांहीं गैर वाटणार नाहीं.

**विश्वेश्वर**—मलाहि त्यांत कांहीं वावगें दिसत नाहीं. बरें आहे, तूं जा आतां, आणि त्रिवेणीला इकडे धाडून दे. वनभोजनाला कोणत्या दिवशीं जावयाचें तें मी ठरवून तुला लवकरच कळवितों.मात्र मी नाहीं हो येथून हलायचा!

**वाराणशी**—तें कांहीं सांगायला नको.

[ जाते.

**विश्वेश्वर**—( स्वगत ) मनुष्याचें जीवित नेहमीं असेंच विरोधमय असावयाचें का ? त्याचा कल एका बाजूचा, तर त्याच्या भोंवतालच्या प्रत्येक गोष्टीची त्याच्या विरुद्ध धांव असावयाची. आगगाडींतून प्रवास करणाराला जवळची प्रत्येक वस्तु उलट गतीनें धांवतांना दिसते. दूर-दूरचे वृक्ष आपल्याच दिशेनें प्रवास करीत आहेत असा प्रथम भास होतो, पण जवळ गेल्यावर त्यांचीहि गति प्रतिकूलच दिसून येते. तसाच प्रकार या संसाराचा आहे. मनाप्रमाणें सर्व गोष्टी घडलेल्या पाहण्याची मनुष्याची हौस या जगांत पूर्ण होण्याची मुळींच आशा नसते, हेंच खरें. दिव्य वस्तूंची प्राप्ति व्हावी ह्मणून मनुष्य तरुणपणीं सारखा प्रयत्न करीत असतो. परंतु पृथ्वी आणि आकाश यांचा क्षितिजरूपी संयोग जसा प्रत्यक्ष अनुभवानें आभासरूप ठरतो, त्याप्रमाणें मनुष्यास दिव्य वस्तूची प्राप्ति हीसुद्धां अखेरीस केवळ कविकल्पनाच ठरते. पण या पहा, त्रिवेणी आणि यमुना इकडेच बोलत येत आहेत. त्यांच्या बोलण्यांत आपला व्यत्यय कशाला उगीच ! त्यांचें झाल्यावर मग सावकाशीनें सांगितलें तरी चालेल. त्रिवेणीच्या बरोबर यमुना आली, हेंहि चांगलेंच झालें.

[ त्रिवेणी व यमुना प्रवेश करितात. ]

**यमुना**—गडे, काकांनीं तुला एकटीलाच बोलाविलें आहे, आणि तेंहि कांहीं महत्त्वाची गोष्ट सांगण्याकारितां; मी कशाला येऊं उगीच तुझ्याबरोबर ?

**त्रिवेणी**—यमुने, काय असेल तें असो. आज बाबा मला जी गोष्ट सांगणार आहेत, तिचा माझ्या आयुष्यावर बराच मोठा परिणाम होणार, अशी आपली माझी मनोदेवता मला सांगते. नाहीं तर त्यांनीं आजपर्यंत कधींहि मला एकटीला बोलाविलें नाहीं, तें आजच कां बोलाविलें असतें? अशा प्रसंगीं तुझ्यासारखी जिव्हाळ्याची मैत्रीण जवळ असलेली बरी नाहीं का ?

**यमुना**—गोष्ट लग्नाशिवाय दुसरी अशी कोणती असणार ? त्रिवेणि, तूं या कामांत अगदींच भोळीभाबडी पडलीस. तुझ्यावर किती वरांचा डोळा आहे, तुला माहितहि नाहीं.

**त्रिवेणी**—असें काय माझें सौंदर्य लागून राहिलें आहे ?

**यमुना**—कमलिनीला कुठें माहित असतें, कीं आपणांत रस आहे कीं नाहीं तें ? या कामांत तिच्याभोंवतीं घिरट्या घालणारे भुंगेच तिजपेक्षां अधिक मार्मिक असतात.

**त्रिवेणी**—ज्या सौंदर्यानें चटोर लोकांच्या चेष्टांना पोषण मिळतें, असलें सौंदर्य नसलेलें बरें नाहीं का ?

**यमुना**—सौंदर्यानें बिचाऱ्यानें काय पाप केलें आहे ? आणि अशा चटोरांना भिऊन तरी कसें चालेल ? त्यांचे दांत युक्तीनें त्यांच्याच घशांत घातले, ह्मणजे फिरून आपणांला त्यांच्यापासून त्रास कसा तो होतच नाहीं. बरी आठवण झाली. त्रिवेणि, हे तुमच्या घरीं जे जोशीबुवा पाहुणे ह्मणून राहिले आहेत, त्यांची तुला कांहीं माहिती आहे का ?

**त्रिवेणी**—( खालीं मान घालून ) ते कुलीन आहेत, चतुर आहेत, उदार आहेत, यापलीकडे मला काय माहिती असणार ?

**यमुना**—( एकीकडे ) हिच्या चर्येवरून जोशीबुवांनीं आकाशांतल्या नक्षत्रांप्रमाणें पृथ्वीवरच्या नक्षत्रांसहि अंकित करण्याला सुरवात केलेली दिसते.हिचें लक्ष जोशीबुवांशिवाय इतर कोणाकडे नाहीं,हें उघड आहे. कदाचित हिची व त्यांची जोशीबुवांसंबंधानें भेट झाली असावी. विचारून पाहूं या.(उघड) बरें,त्यांचे स्नेही तुझ्या पहाण्यांत आहेत का ?

**त्रिवेणी**—कोण ते ?

**यमुना**—भार्गवराव.

**त्रिवेणी**—नाहीं बाई. मीं कधीं हें नांवहि ऐकिलें नाहीं; मग माहीत कुठून असणार ? यांनासुद्धां मी या चारपांच दिवसांतच पहातें आहें. या अवधींत त्यांच्याबरोबर स्नेह्यासारखें कोणीच दिसलें नाहीं.

**यमुना**—(एकीकडे) ते हिच्या मोहांत गुरफटण्याच्या बेतांत आहेत, हें बिचारीच्या ध्यानींमनींहि नाहीं.( उघड) हे पहा काका उभे आहेत. काका, मी आलें त्रिवेणीबरोबर तर चालेल का ?

**विश्वेश्वर**—यमुने, तुझ्यासारखी व्यवहारज्ञ मैत्रीण या वेळीं त्रिवेणी-बरोबर अवश्य पाहिजे होती. देवानेंच तुला धाडून दिलें ह्मणावयाचें.

**त्रिवेणी**—बाबा, या तुमच्या शब्दांवरून माझ्या जिवाचा कसा थरकांप होतो आहे.इतकी भयंकर कोणती गोष्ट सांगणार आहांत मला ?

**विश्वेश्वर**—भयंकर ह्मटली तर भयंकर आहे, आनंदाची ह्मटली तर आनंदाची आहे. सगळें तुझ्या दृष्टीवर अवलंबून आहे.

**त्रिवेणी**—सांगा लवकर, मला आतां मुळींच धीर निघत नाहीं !

**विश्वेश्वर**—मी तुझा कोण आहें, सांग पाहूं.

**त्रिवेणी**—तुह्मी नात्यानें माझे दूरचे संबंधी आहांत.पण तुह्मीं दाखविलेल्या प्रेमानें आणि केलेल्या उपकारांनीं मला वडिलांपेक्षांहि अधिक आहांत.

**विश्वेश्वर**—बाळे,मी तुझा लांबचाहि संबंधी नाहीं. मी एकदां यात्रेहून परत येतांना वाटेंत एका ब्राह्मणाकडे मुक्कामाला उतरलों असतां तो ब्राह्मण तुला एकटीला सोडून आपल्या साऱ्या कुटुंबासह घर सोडून निघून गेला. अशा स्थितींत मला तुझा प्रतिपाळ करावा लागला.केवळ दयेनेंच घेतलेला तुझा पत्कर दिवसेंदिवस तुझ्या सहवासानें प्रेमाचा वाटूं लागला; आणि आतां तर तो माझें जीवनच होऊन बसला आहे.

**त्रिवेणी**—नातें नाहींसें झालें, ह्मणून आपण केलेले उपकार तर नाहींसे होत नाहींत ना ?

**विश्वेश्वर**—त्रिवेणि,मीं तुला आजपर्यंत पोटच्या मुलीप्रमाणें वागविलें; तेव्हां तुला मजबद्दल प्रेम वाटणें साहजिकच आहे.आणि खरोखर सांगतों, तुझ्यासारख्या प्रेमळ मुलीचें मजवर प्रेम असावें याचा मला अभिमान वाटतो. पण त्याबरोबरच मला असेंहि वाटतें, कीं मी अशा राजबिंड्या मुलीचा बाप शोभत नाहीं.

**त्रिवेणी**—गंगूताईला शोभतां आणि मला शोभत नाहीं, असें मीं काय पाप केलें आहे ?



**त्रिवेणी**—माझ्या वडिलांच्या भेटीपासून मला जरी आनंद झाला, तरी आपल्या वियोगामुळें होणारें दुःख त्यानें कसें कमी होणार? [ पृष्ठ ७३. ]

**विश्वेश्वर**—गंगूनें अंगीं किती जरी उसनें अवसान आणिलें, आणि कितीहि उंची वस्त्रें वापरलीं, तरी ती उघड उघड भिक्षुकाची मुलगी दिसते; आणि तूं जरी भिकार वस्त्रें नेसली असलीस, तरी तूं चांगल्या गर्भश्रीमंत गृहस्थाची मुलगी शोभतेस.तिच्या आणि तुझ्यामधील अंतर अंधळाहि सांगूं शकेल !

**त्रिवेणी**—तुह्माला बाबा ह्मणायला मला जसा अभिमान वाटतो, तसा राजाची मुलगी ह्मणवून घेण्यांतहि वाटणार नाहीं.

**विश्वेश्वर**—तें मला पूर्णपणें माहीत आहे; आणि ह्मणूनच तुला ती बातमी सांगण्याचें माझ्या जिवावर आलें आहे. बाळे, तुझा जन्मदाता पिता तुझा शोध करीत आहे, असें या जाहिरातीवरून दिसतें.

**त्रिवेणी**—माझ्या वडिलांनीं आपखुषीनें माझा त्याग केला, तर मग त्यांना आजच कोणीकडून माझी आठवण झाली ?

**विश्वेश्वर**—ज्यानें तुझा त्याग केला त्याच्या सांगण्यावरून असें दिसतें,कीं त्यानें तुला जन्म दिला नसून त्याजपाशीं तुझ्या पित्यानें तुला ठेव ह्मणून ठेविली होती. आणि तोच हल्लीं तुझ्या शोधांत आहे असें दिसतें.

**त्रिवेणी**—माझ्या वडिलांच्या भेटीपासून मला जरी आनंद झाला, तरी आपल्या वियोगामुळें होणारें दुःख त्यानें कसें कमी होणार ? आजपर्यंत मला कधीं दुखलेंखुपलें, तेव्हां तुह्मींचना माझा समाचार घेतला ? दुखण्यांत रात्रीचा दिवस करून माझ्या उशाशीं तुह्मीच जागलांत ना ? लहानपणीं माझ्या मनाला करमेनासें होई, तेव्हां मला परोपरीचीं खेळणीं देऊन माझें मन तुह्मींच रिझविलें ना ? मी उपाशी असतां तुमचेंच मन कळवळत असे ना ? मी रडूं लागलें असतां पदरानें तुह्मींच माझे डोळे पुसले ना ? मी एकदां मरणाच्या दारीं पडलें होतें, तेव्हां प्रेमानें मला अश्रुस्नान तुह्मींच घातलें ना? बाबा, या साऱ्या गोष्टी तुह्मीं माझ्याकारितां केल्या आहेत. असें असतां तुह्माला त्यांच्या हातीं

मला देववेल का ? तुह्मीं जरी मला लाथेनें झुगारून दिलें, तरी मी हे पाय सोडणार नाहीं.मीं याप्रमाणें तुमच्या पायांवर लोळण घेतली असतां, मला त्यांच्या हातीं देण्याचा तुह्माला खास धीर होणार नाहीं.

**विश्वेश्वर**—बाळे त्रिवेणि, असे कठोर शब्द बोलूं नकोस. आतां मी जो तुला तुझ्या पित्याच्या स्वाधीन करणार, तो आनंदानें करणार असें तुला वाटतें का ? त्या वेळीं मी आपलें काळीज काढून त्याच्या हवालीं करतों आहें, असेंच मला वाटणार. मुलीला प्रथमतः सासरीं पाठवितांना कोणता बाप तिला आनंदानें निरोप देतो ? मी तुला या वेळीं जरी मोहामुळें सोडलें नाहीं, तरी थोड्याच दिवसांनीं तुला तुझ्या पतीच्या स्वाधीन करितांना तो मोह आवरावाच लागेल ना ?

**यमुना**—काका, ही जाहिरात त्रिवेणीच्या अभिलाषानें आणि हिचा त्याग करणाऱ्या कसाबाच्या मदतीनें कोणीं तरी कपटानें दिली नसेल कशावरून ? त्रिवेणीसारखें रत्न मिळविण्यासाठीं कुणीहि हें धाडस करील. ( एकीकडे ) मला तर हें कृत्य भार्गवरावांचेंच असावेंसें वाटतें. (उघड) काका, मी ह्मणतें असें नसतें, तर त्या जाहिरातवाल्यानें आपलें नांवगांव नसतें का दिलें ?

**विश्वेश्वर**—यमुने, देव करो, आणि तुझ्या ह्मणण्याप्रमाणें ती जाहिरात खोटी ठरो ! मी मघांपासून बाह्यात्कारीं हिची समजूत घालीत होतों खरा, पण माझ्या पोटांत जी कालवाकालव चालली होती, ती माझी मलाच माहित.

**यमुना**—आतां असें करा, कीं त्रिवेणीला येथून कोठें तरी जवळपास पाठवून द्या. तिच्यामागें मी या जाहिरातीबद्दल कोणाकडून तरी शोध करवितें. त्या शोधापासून काय काय निष्पन्न होतें तें कळल्यावर बाकीच्या गोष्टी ठरवितां येतील.

**विश्वेश्वर**—उद्यां पहांटेसच आरामबागेकडे सर्वांची रवानगी करून देतों. यमुने, तुला मीं आरंभींच व्यवहारज्ञ ह्मटलें, तें नांव तूं सार्थ

करून दाखविलेंस खरें. आतां असें कर. मी जरा बाहेर जातों. अजून त्रिवेणीनें हुंदका आवरला नाहीं. मी परत येईपर्यंत हिची नीट समजूत घाल, आणि मग हिला घरांत घेऊन जा. हिचे असे डबडबलेले डोळे घरांत कोणाच्याहि दृष्टीस पडून उपयोग नाहीं.

[ जातो.

**यमुना**—गडे, डोळे पूस. तुला जी शंका वाटते आहे, तिला कांहीं देखील कारण नाहीं, असें शोधाअंतीं दिसून येईल. अंधारांत चालणाराला पावलापावलाला भुताची शंका येते; पण दिवा आणिला, कीं आपल्या शंकेचा फोलपणा त्याच्या नजरेला येतो.

**त्रिवेणी**—यमुने, तूं माझी कितीहि समजूत घातलीस, तरी माझ्या मनांत उठलेलें काहूर शांत होत नाहीं. मनांत वेड्याविद्या कल्पना येतात. मजवर लवकरच कांहींतरी मोठें संकट येणार, असें मला वाटत आहे.

**यमुना**—(एकीकडे) हिची मनोदेवता लवते त्याप्रमाणें जर हिच्यावर संकट आलेंच, तर तें कोणत्या दिशेनें येणार याची अटकळ मला थोडीफार झालेलीच आहे. त्या संकटापासून हिचें रक्षण करण्याकरितां व हिच्याविरुद्ध होणाऱ्या कपटाशीं कपटानेंच लढण्याकरितां मला अगोदर हिचा ताईत हस्तगत करून घेतला पाहिजे. मग लावा ह्मणावें कसा शोध लावतां तो! (उघड) गडे त्रिवेणि, तुझी चित्तवृत्ति जी अशी उद्विग्न झाली आहे तिचें कारण केवळ ही जाहिरात, दुसरें तिसरें कांहीं नाहीं. या जाहिरातीच्या मुळाशीं प्रेम आहे कीं कपट आहे याची शहानिशा झाली, कीं आपोआपच तुझा उद्वेग नाहींसा होणार आहे.

**त्रिवेणी**—ती शहानिशा कशी होणार?

**यमुना**—तें माझें काम. पण तें तडीला न्यावयाला कांहीं दिवस हा ताईत तुझ्यापासून दूर करण्याची जरूर आहे.

**त्रिवेणी**—गडे, हा ताईत अगदीं लहानपणापासून माझ्या गळ्यांत असलेला आठवतो. हा माझ्या जन्मदात्यानें बांधला असावा. कदाचित्

माझ्या आईच्या हातांचाहि याला स्पर्श झाला असावा. माझ्या
पासूनचा हा सोबती माझ्यापासून कधींहि दूर होऊं नये, अश
इच्छा असणें साहजिक आहे; त्यामुळें तो देण्यास माझा हात वाह
तरी पण, ज्याअर्थी तूं हें सारें माझ्या बऱ्याकरितांच करीत
त्याअर्थी मीं तुजवर इतकासुद्धां विश्वास न ठेवणें कृतघ्नपणाचें
हा घे. (देते.) पण हा जिवापलीकडे जपून ठेव हो.

यमुना—माझ्या त्रिवेणीनें जो ताईत इतके दिवस कंठांत
तो माझ्याहि गळ्यांतला ताईतच राहणार. त्याला मी कशी विस
पण त्रिवेणि, हे वेडेविद्रे विचार डोक्यांतून काढून टाक, आणि
प्रसन्न ठेव.

त्रिवेणी—मी आपणाकडून यत्न करीनच.

यमुना—(स्वतःशीं) हिची उदासीनता कसेंहि करून
पाहिजे. ही वाढत गेली तर हिच्या हातून एखादे वेळीं भलतान
व्हावयाचा. हिला उत्साह आणण्याचा मी आपणाकडून
करितेंच. पण या कामीं जोशीबुवांचाहि उपयोग करून घेता
आणि हिला पुन्हा हुषारी वाटेपर्यंत हिजकडे लक्ष पुरवायला
सांगितलें पाहिजे. या लक्ष पुरवण्याचा जर त्रिवेणीच्या मनाप्रमा
झाला, तर ती गोष्ट मलाहि इष्टच आहे.

[विश्वेश्वर व धुरंधर प्रवेश करितात.]

विश्वेश्वर—अरे, अजून तुह्मी येथेंच आहांत कीं! फार
तर घरांत संशय येईलना?

[त्रिवेणी व यमुना

विश्वेश्वर—जोशीबुवा, मी आपणाला एकांतीं बोलाव
जरा चमत्कारिक आहे. 'दुंदुभि' पत्रांतील ही जाहिरात अ
असेलच?

धुरंधर—होय, वाचली आहे.

**विश्वेश्वर**—या जाहिरातीचा माझ्या हिताहिताशीं बराच संबंध येतो. ह्मणून हिच्यांत लिहिलेल्या वेळीं स्मशानांत कोण कोण येतें, हें कळण्याची मला उत्कंठा लागली आहे. हें काम सांगण्याला योग्य असा आपणा-वांचून दुसरा मनुष्य मला दिसेना; ह्मणून आपणास तसदी दिली.

**धुरंधर**—आपण मला थोरपणानें घरांत आश्रय दिलात, इतकेंच नाहीं,तर विश्वासाला पात्रहि ठरविलेंत, हे आपले मोठे उपकार आहेत. मी आपलें हें काम होईल तितक्या सावधगिरीनें पार पाडून आपला विश्वास अस्थानीं नाहीं असें आपल्या प्रत्ययाला आणीन, अशी आशा आहे. तेथें बहुधा फार मनुष्यें जमणार नाहींतच ?

**विश्वेश्वर**—प्रत्यक्ष संबंध असलेल्या मनुष्यांशिवाय इतर माणसें येऊं नयेत, ह्मणून तर स्थळ आणि वेळ इतकीं विचित्र दिलीं आहेत. यामुळें कांहींजणांना ही निव्वळ थट्टा वाटेल, आणि बाकीच्यांना स्मशा-नांत जायचा धीरच होणार नाहीं. आपण तेथून परत आलांत, कीं थेट माझ्या खोलीकडेच या. मी दार तुमच्याकरितां मुद्दाम उघडेंच ठेवीन.

[ जातो.

**धुरंधर**—( बाहेर येऊन स्वतःशीं ) या जाहिरातीशीं शास्त्रीबुवांचा काय संबंध ? कांहीं का असेना. तिचा राजकुलीनांशींच विशेष संबंध पोहोंचत असल्यामुळें मला तेथें जाणें भागच होतें.

**यमुना** ( प्रवेश करून )—जोशीबुवा,तुह्मीं त्या दिवशीं माझ्या कानांत जी गोष्ट सांगितली, तिचा मोबदला ह्मणून मी तुमच्या कानांत तुमच्या हिताची एक गोष्ट सांगूं का ?

**धुरंधर**—सांगितली तर मी मोठ्या आनंदानें ऐकेन.

**यमुना**—( एकीकडे ) यांचें त्रिवेणीकडे चित्त वेधण्याकरितां मी तिची मनःस्थिति यांना जरा फुगवूनच सांगतें. ( उघड ) हें पहा, त्रिवेणी आज जरा बावरल्यासारखी झाली आहे. ती आपल्या जिवाचें कदाचित् कांहीं बरेंवाईटहि करून घेईल; ह्मणून तिच्यावर सारखी पाळत ठेवा.

**धुरंधर**—यमुनाताई, मी या बातमीबद्दल तुमचा अत्यंत ऋणी आहें. तिच्यावर लक्ष ठेवण्यांत मी बिलकूल कसूर करणार नाहीं. तुह्मी अगदीं निर्धास्त असा.

[ जातो.

**यमुना**—( स्वतःशीं ) काका आणि त्रिवेणी मानितात त्याप्रमाणें हा ताईत नुसता मंत्राचाच आहे, कीं त्यांत कांहीं विशेष आहे ? पण हातच्या कांकणाला आरसा कशाला ? याचे हे दांते मोकळे करून हा उघडून पुन्हा बंद कारितां येण्यासारखा आहे. पाहूंच या उकलून. ( ताईत उघडते. ) हा कागद कसला यांत ? ( कागद काढते. ) हा तर एक चमत्कारिक आकृति काढलेल्या कागदाचा वांकडातिकडा फाडलेला तुकडा आहे. या आकृतीवरून हा मंत्राचाच ताईत दिसतो. हा ताईत मला दुसऱ्या कोणातरी मुलीच्या गळयांत बांधावा लागणार. तेव्हां हें यंत्र तूर्त आपल्याच जवळ राहिलेलें बरें. पण हा ताईत कोणाच्या गळ्यांत बांधावा बरें ? मी विचारांत काय पडलें ? ती ह्माळसा गंगूताईच्या शिकवणीवरून अलीकडे बरीच चढून गेली आहे. तिच्यावरच याचा प्रयोग करून पाहूं. ह्मणजे तिकडचीहि जरा मौज करायला सांपडेल.

[ जाते.

---

## प्रवेश पांचवा.

[ श्रीपति व ह्माळसा. ]

**ह्माळसा**—मी न्हाई येऊं दियाची तुला घरामंदी.

**श्रीपति**—मला न्हाई येऊं देनार, तर मंग तूं चल माज्यासंग भाईर.

**ह्माळसा**—मीबी न्हाई येनार. तुजी गांटच नग पडाया.

**श्रीपति**—इक्ता माजा कटाळा कशापायी करतियास, ह्माळश्ये ?

ळसा—येच्याह्मोर मला ह्माळसाबाई, ह्माळसाबाई ह्मनाया व्होवं. मी व्हनार सरदाराची रानी. आतां काय मला गाड्या, घोडी, काय कमी हाय ? तुला चाकरी व्होवी असल तर ये माज्याकड.

पति—ह्माळश्ये—

ळसा—येक इळा सांगितलं न्हवं ह्माळसाबाई ह्मन म्हून ?

पति—तूं कितीबी मोटी सरदारीन जालीस तरीबी माजी ह्माळशी ळशीच. तूं मला शिरपतराव ह्मनाया लागलीस तर मला त्ये वंगाळ नार.

ळसा—माज अल्डाय ख्येटुर तुला शिपतरराव ह्मनाया!

श्रीपति—बरं, पन् असं मला हाडह्मड करायचं तुला कारन ?

ह्माळसा—तुज्या कांबरुनास्नी वंगाळ घान मारतिया ह्मन, आन् तुज ठनंबी अक्षी कुनबटावानी हाय ह्मन.

श्रीपति—आन् तुज हाय मोटं बामनावानी ? तसं ह्मनशील तर मला पुन्बी जाड सबूद येत्याती. सपस्ट, अन्याव, अग्यान, इस्कूल—

ह्माळसा—पन तुला सिक्सन कुट हाय ?

श्रीपति—सिक्सन ? त्ये काय असतं ?

ह्माळसा—तूंच सांगनास. तुला मोटमोट सबूद लई ठाव हायती!

श्रीपति—ह्ये सिक्सन न्हाई बा ठावं. थांब आं—लक्सन, दिवाळसन, ई, जमना. हं, जमलंया, जमलंया—सिक्सन ही जखनीची भन असल. नं मंतर फुंकूनशान् तुला याड लावूनशान् सोल्डया. बोल, मी ह्मनतो खरं ना ?

ह्माळसा—मलाबी म्हाईत न्हाई सिक्सन ह्मंजी काय हाय त्ये.

श्रीपति—मंग तूं काय मला मगादरन हिनवाया लागलीस मला क्सन न्हाई म्हून् ? आन् मी जर खिशामदून काल्डी येकांदी चीज, ान् ह्मनलं ह्येच हाय सिक्सन, तर तूं न्हाई म्हून कसं ह्मंगनार ?

ह्माळसा—मला ताईसाबांनीं सांगितलया, कीं तुला सिक्सन न्हाई ह्मून.

**श्रीपति**—अस्सं! तुला लागला हाय थ्वारामोठ्यांचा पदूर. मंग त्येंच्याम्होर माज काय चालनार? म्हाळश्ये, जातुं बरं. ( जाऊं लागतो. पुन्हा परतून जवळ येऊन ) ह्ये पग, तूं आपल्या तोंडानं जा म्हून सांगितल्याबिगार ह्यो न्हाई जानार. बोल! जाऊ व्हय?

**म्हाळसा**—जा.

**श्रीपति**—( एकीकडे ) इची भन्, काय करावं आतां? मला वाटलं, रागानं त्वांड आवळून बसल, आन् जा म्हूनशी न्हाई म्हनायची. पन फसलं त्ये संमदं. आतां न्हाई त्येला विलाज.

[ तिजकडे पहात जातो.

**म्हाळसा**—इक्ता मला राग आलाया! असं वाटतया, त्येला फिरून हटकावा आन् खूप त्येचं काडावं. पन् त्यो ग्येलाच दूर.

**यमुना**—( प्रवेश करून ) म्हाळसे, त्याला घालवून दिलेंसना? फार चांगलें केलेंस.

**म्हाळसा**—ताईसाब, आपुन् अशी माजी पाट थोपाटली मंजी माजं दुक कमी व्हतं.

**यमुना**—दुःख कशाचें?

**म्हाळसा**—त्यो निगून ग्येला त्येचं.

**यमुना**—तो निघून गेला म्हणून तुला दुःख होतें?

**म्हाळसा**—तसं न्हव. मी त्येला र्‍या दिल्याबिगार त्यो निगून ग्येला म्हून.

**यमुना**—तसें असेल तर मग ठीक आहे. म्हाळसे, तुला श्रीमंत नवरा द्यावयाचें गंगूताईनें कबूल केलें आहेना?

**म्हाळसा**—व्हय व्हय. त्येंच्यावर तर हाय माजं समदं.

**यमुना**—पण मुलीचा बाप श्रीमंत असल्यावांचून तिला श्रीमंत नवरा मिळायचें जरा जड जातें.

**म्हाळसा**—त्येला काय ताईसाब विलाज? कारबारी करतां येतुया तसा बा न्हाई करतां येत.

**यमुना**—तें खरें. पण मी तुला एक ताईत देणार आहें. तो तूं गळ्यांत घातलास ह्मणजे लागलीच एखाद्या श्रीमंत मनुष्याला तुझा बाप होण्याची बुद्धि होईल.

**ह्माळसा**—द्या तर मंग त्यो ताईत.

**यमुना**—हा घे. ( ताईत देते. ) हा उद्यां पहांटेच्या मुहूर्तावर गळ्यांत बांधायचा. समजलीस ?

**ह्माळसा**—ह्यो तर तिरवेनीताईंचा हाय.

**यमुना**—होय, तिचाच तो. तो मीं तुझ्याकरितां मुद्दाम मागून घेतला आहे. याच्या अंगीं असा अद्भुत गुण होता, ह्मणून तर काकांनीं तिला आपल्या मुलीप्रमाणें पोसलें. करशीलना मग मीं सांगितलें त्याप्रमाणें ?

**ह्माळसा**—कां म्हून न्हाई करनार ? माजं त्यामंदी थ्वाडंच वंगाळ व्हनार हाय !

[ जातात.

---

## प्रवेश सहावा.

[ स्मशानांत चितेजवळ तोंडावर वस्त्र घेऊन श्रीपति निजला आहे. इतक्यांत एकीकडून धुरंधर व दुसरीकडून भार्गव प्रवेश करितात. ]

**भार्गव**—( स्वतःशीं ) जाहिरातीचा राजकुलीनांशीं संबंध असल्या-मुळेंच स्वारी येथें आल्यासारखी दिसते.

**धुरंधर**—( स्वतःशीं ) मी जाहिरातीनें आकर्षिला जाऊन येथें येणार, असें वाटून माझ्या संरक्षणाची तर्तूद करण्याकरितां भार्गवहि येथें तयार ! खरोखर, माझ्या हितास इतका जागणारा दुसरा कोणीहि स्नेही मला मिळणार नाहीं. ( भार्गवाशीं कुजबुजतो, व नंतर श्रीपतीस हलवून जागें करतो. )

श्रीपति—इचीभन ह्यापच लागली व्हती की!

धुरंधर }
भार्गव } —( स्वतःशीं ) काय, कुणबी?

धुरंधर—कुणबीदादा, इकडे कोणीकडे अशा रात्रीं?

श्रीपति—जकड तुमी तकड मीबी. घरामंदी अक्षी ढ्येकन चावत व्हती; ह्मून क्येला इचार, मसनवाटींत येक इळा निजल्वं ह्मंजी मानूस उटत न्हाईत ततंच लवंडावं. आतां कोन ल्येकाचा न्हातो हत?

[ जातो.

धुरंधर—(स्वतःशीं) वस्ताद आहे. आपणहि जावें. (भार्गवास मानेनें खुणावून जातो. श्रीपति प्रवेश करून धुरंधराच्या पाठोपाठ जातो. त्याचे मागोमाग भार्गव जातो. )

---

## प्रवेश सातवा.

धुरंधर—( स्वतःशीं ) त्या कुणब्याचा जाहिरातीशीं काय बरें संबंध असावा? कांहीं असो. तो आल्याची बातमी शास्त्रीबुवांच्या कानांवर घालावयाला विलंब करितां उपयोगीं नाहीं. ( खोलीचे दारावर हलकेच थाप मारितो. दार उघडतें व विश्वेश्वरशास्त्री बाहेर येतात. )

विश्वेश्वर—कां? जोशीबुवा, काय बातमी आणिलीत?

धुरंधर—स्मशानांत एकच इसम कायतो आला होता; आणि तो जातीनें कुणबी होता.

विश्वेश्वर—कुणबी? बरें, त्याचें वय काय असावें?

धुरंधर—रात्र अंधारी असल्यामुळें आणि त्यानें तोंडावरून वस्त्र घेतल्यामुळें मला वयाचा अंदाज करितां येईना.

विश्वेश्वर—( स्वतःशीं ) अरेरे! या प्रकाराला अटकळीपलीकडचें हिडिस स्वरूप येऊं पहात आहे. तर काय, त्या ब्राह्मणापाशीं ज्यानें मुलगी ठेविली तो कुणबी होता? आणि तो ब्राह्मण होता असें त्या

ब्राह्मणानें मला सांगितलें, तें खोटेंच का? अरेरे! हें बिचाऱ्या त्रिवेणीला कळलें तर तिची काय अवस्था होईल? ( उघड ) बरें, त्याच्या वर्तनांत कांहीं संशयास्पद असें तुह्माला दिसून आलें का?

**धुरंधर**—मीं त्याला स्मशानांत येण्याचें कारण विचारलें, तेव्हां तो त्याला कांहीं तरी उत्तर देऊन तेथून निघून गेला. पण मी परत येतांना मागें वळून पाहिलें, तेव्हां तो मागोमाग येतांना दिसला, व मी घरांत शिरेपर्यंत तो सारखा माझा पाठलाग करीत होता.

**विश्वेश्वर**—जोशीबुवा, उद्यां मोठ्या पहांटेस घरांतील सर्व मंडळींना उठवून आरामबागेकडे घेऊन जा. सूर्योदयापूर्वीं तुह्मीं तेथें पोहोंचलें पाहिजे.

[ जातो.

**धुरंधर**—( स्वतःशीं ) हा काय प्रकार आहे, कांहीं कळत नाहीं. याचा त्रिवेणीशीं संबंध असला पाहिजे, असें मात्र यमुनेच्या सूचने-वरून उघड दिसतें खरें. अरे, पण तिच्या सूचनेप्रमाणें मला त्रिवेणी-कडे लक्ष पुरवायला अजून फारसा वेळच झाला नाहीं. हें काय वाजलें? आणि त्या दारामागून लुगड्याचा पदरहि नाहींसा झाल्याचा भास झाला. त्रिवेणीच ती! पण या वेळीं ती एकटी अंगणांत जाण्याचें कारण काय? यमुनेनें सांगितल्याप्रमाणें कांहीं भलतेंसलतें करण्याचें तर तिनें योजिलें नाहींना? तसें असेल तर मला धांवतच तिच्या मागोमाग गेलें पाहिजे. मात्र अंगणाचा भाग माझ्या चांगल्या परिचयाचा नाहीं ही एक अडचणच आहे.

[ जातो.

---

## प्रवेश आठवा.

[ त्रिवेणी विहिरीच्या कांठीं उभी आहे. ]

**त्रिवेणी**—( स्वतःशीं ) दार वाजलें तेव्हां मला कल्पनाहि आली नाहीं, कीं ते बाबांना अशी भयंकर बातमी सांगणार आहेत. आज

सकाळपासून बाबा त्या जाहिरातीसंबंधानें चौकशींत होते, ह्मणून मी तेव्हांपासून सारखी पाळतीवरच होतें. ते बाबांच्या खोलींत गेल्याबरोबर त्यांनीं मजबद्दल काय बातमी आणली आहे, तें जाणण्याची उत्कंठा वाटून मी त्या दाराच्या आड उभी राहिलें मात्र, तोंच ते वज्रासारखे शब्द कानांवर आदळले. महाराज, ज्या मुखानें आपण माझ्याशीं ते मधुर सांत्वनपर शब्द बोललांत, त्याच मुखानें मला ही दारुण वार्ता ऐकविलीत ना? पण तुह्माला काय माहीत, कीं मी दाराआड उभी राहून ऐकत आहें? हरहर! मी हा लोक सोडून गेलें असें बाबांना कळलें, ह्मणजे त्यांचा जीव शोकानें कासावीस होईल. माझ्या नांवानें हंबरडा फोडून ते आक्रांत करतील. पण बाबा, तुमच्याचकरितां बरें मी हें साहस करीत आहें! तुह्मी अत्यंत पवित्र आचरणाचे आणि स्नानसंध्याशील ब्राह्मण. यापुढें मी शूद्रकन्या तुमच्या घरांत राहिलें असतें, तर तुह्माला केवढें संकट वाटलें असतें! माझ्या पाठीवरून हात फिरविण्याची प्रेमानें प्रेरणा केली असती, आणि लागलीच धर्मबुद्धीनें तो हात मागें ओढला असता! मी तुमच्याकारितां रोज स्वतः आपल्या हातानें तऱ्हेतऱ्हेचीं पक्वान्नें करून वाढीत असें, आणि मला बरें वाटावें ह्मणून तुह्मी त्यांची स्तुति करीत तीं प्रेमानें खात होतां. पण आतां माझ्या हातचें पाणी घेणें ह्मणजेसुद्धां पाप होईल. आजपर्यंत आपल्या परम पूज्य चरणांच्या संवाहनाचा मान मजकडेच असे. पण आतां मला आपली सांवलीहि आपणावर पाडतां कामा नये. आपलें मजवरील अकृत्रिम प्रेम आणि यापुढें पडणारें कृत्रिम अंतर यांच्यामध्यें आपली फार ओढाताण होईल. ती न व्हावी हाच या आत्मघाताचा हेतु आहे. आणि आपल्या सेवेचें जें पुण्य माझ्या पदरीं माझ्या भाग्यानें आजवर पडलें आहे, तें या महत्पापासून माझा उद्धार करील अशी माझी खात्री आहे. महाराज, आपण मला राजपद मिळण्याविषयीं जें भविष्य केलें होतें, तें चुकलें ह्मणून विषाद वाटूं देऊं नका. तें वास्तविक पहातां

खरेंच ठरलें आहे. कारण आपण मनानें राजे शोभण्यासारखे आहांत, आणि मी आपणास मनानें वरिलेंच आहे. याहून उच्च राजपद कोणतें असणार आहे! ( पडद्यांत--'त्रिवेणि, थांब, थांब, असें धाडस करूं नकोस!') तेच आले वाटतें. देवा, त्यांना आणि बाबांना सुखी ठेव. ( विहिरींत उडी टाकते. )

**धुरंधर** ( प्रवेश करून )—अखेरीस तिनें माझें कल्याण चिंतून टाकलीच उडी! या विहिरीला पायऱ्या आहेत, पण त्यांनीं उतरण्यापुरता अवकाश राहिला नाहीं. येथूनच उडी टाकावी. (उडी टाकतो.)

( धुरंधर त्रिवेणीला घेऊन पायऱ्यांवरून चढत वर येतो. )

**धुरंधर**—त्रिवेणि, डोळे उघड आणि माझ्याकडे पहा. उडी टाकतांना माझें कल्याण चिंतिलेंस, आणि आतां माझें अकल्याण करायला कां प्रवृत्त झाली आहेस? तूं जर मला सोडून गेलीस, तर त्याहून मोठें असें माझें कोणतें अकल्याण होणार? तूं आजपर्यंत नुसतें दुःखच भोगलेंस. सुखाचा शब्दहि तुला ऐकायला मिळाला नाहीं. पण यापुढें तुला सुखांत ठेवणें हेंच माझें पवित्र कर्तव्य राहील. नाहींना तुला माझी दया येत?

**त्रिवेणी** ( सावध होऊन )—मी कुठें आहें?

**धुरंधर**—अहाहा! शेवटीं माझी प्रार्थना सफल झाली! त्रिवेणि, तूं आपणावर आणि आपल्या प्रियजनांवर केवढें तरी संकट आणायला उद्युक्त झाली होतीस! गेलें ना मघांचें वेड डोक्यांतून?

**त्रिवेणी**—आठवलें सारें माझें दुर्दैव! महाराज, कांहो माझें यातनामय जीवित लांबवीत आहांत? मी शूद्राची मुलगी आहें, असें आपल्याच मुखानें मला कळलें. आतां बाबांना जें संकट वाटेल, त्यांतून त्यांची सुटका करण्याकरतांच मी प्राण देणार होतें; स्वार्थबुद्धीनें देणार नव्हतें.

**धुरंधर**—त्रिवेणि, तुझ्या कोणत्या कृत्याच्या मुळाशीं स्वार्थबुद्धि असते, ह्मणून याच्या मुळाशीं असेल? तुझ्या जीविताचें जीवनच परोपकार हें आहे. पण मघांचें धाडस करतांना तूं केवळ आपल्या बाबां-

चाच विचार केला होतास. इतरांना काय वाटेल इकडे तुझें अगदींच दुर्लक्ष होतें !

**त्रिवेणी**—मी गेलें तर काकू आणि गंगूताई यांचेंहि कल्याणच झालें असतें.

**धुरंधर**—यांशिवाय तुझें प्रेमाचें दुसरें माणूसच नाहीं ह्मणतेस ?

**त्रिवेणी**—एक माणूस आहे; आणि त्याची आठवण मीं उडी टाकतांना केलीहि होती.

**धुरंधर**—तुला त्याची आठवण क्षणभरच झाली असेल. पण तुझा प्राणत्यागाचा हेतु सिद्धीस गेला असता, तर तूं त्याला जन्मभर तुझी आठवण काढीत रडत बसविलें असतेंस.

**त्रिवेणी**—मी वांचून तरी त्यांना काय फायदा होणार ?

**धुरंधर**—काय फायदा होणार ? जन्मभर तुझ्या सुखकर संगतींत वास व तुझ्या सद्गुणांचें अनुकरण करण्याची संधि, हा काय लहानसहान फायदा झाला कीं काय ?

**त्रिवेणी**—तें या जन्मीं शक्यच नाहीं ! ते ब्राह्मण, मी शूद्र. त्यांचा उगम विराटपुरुषाच्या मुखापासून, आणि माझा त्याच्या पायापासून.

**धुरंधर**—त्रिवेणि, तूं शूद्र आहेस हें अनुमान काढितांना तूं जरा घाई केलीस, हें तुलासुद्धां कबूल करावें लागेल. पण जरी तूं शूद्र आहेस असें घटकाभर कबूल केलें, तरी शूद्री व ब्राह्मण यांचा अनुलोम विवाह करण्याला शास्त्राज्ञा प्रतिकूल नाहींच.

**त्रिवेणी**—शास्त्राज्ञा नसली तरी रूढि आहेना प्रतिकूल ? या रूढीनें आजपर्यंत किती तरी शास्त्राज्ञा पायांखालीं तुडविल्या आहेत !

**धुरंधर**—ज्या राक्षसी रूढीनें अनेक दिव्य शास्त्राज्ञा पायांखालीं तुडविल्या आहेत, तिला पायांखालीं तुडवून त्या धर्माज्ञा पूर्ववत् स्वस्थानारूढ करणें हेंच प्रत्येक खऱ्या धर्मनिष्ठाचें कर्तव्य आहे. त्रिवेणि, ज्या रूढीनें अनुलोम विवाह बंद करून जातीजातींमधील सख्य नाहींसें



**धुरंधर**—ज्या राक्षसी रूढीनें अनेक दिव्य शास्त्राज्ञा पायांखालीं तुडविल्या आहेत, तिला पायांखालीं तुडवून त्या धर्माज्ञा पूर्ववत् स्वस्थानारूढ करणें हेंच प्रत्येक खऱ्या धर्मनिष्ठाचें कर्तव्य आहे. [ पृष्ठ ८६. ]

Manoranjan Press,
Girgaon-Bombay.

Photographers,
Gurudas & Co., Bombay.

केलें, त्या रूढीला झुगारून देऊन तुझा वल्लभ तुझ्याशीं विवाह करण्याला तयार आहे. मात्र तूं पुन्हा आत्महत्या करणार नाहींस, अशी प्रथम शपथ घे.

**त्रिवेणी**—पुन्हा आत्मघाताचा प्रयत्न मी करणार नाहीं असें मी कबूल करतें, आणि माझी कबुली हीच माझी शपथ समजावी. मात्र ही कबुली मी वल्लभप्राप्तीच्या आशेनें देत नाहीं. कारण, माझा वल्लभ जरी माझ्याकरितां उदारपणानें समाजाचा रोष आपणावर ओढून घ्यायला तयार झाला, तरी त्याच्या औदार्याचें अनुकरण करून त्याचें त्या रोषापासून रक्षण करणें हें माझेंहि कर्तव्य आहे.

**धुरंधर**—त्रिवेणि, तुझ्या गुणांची जों जों अधिक परीक्षा पहावी, तों तों ते अनंत दिसूं लागतात. तुझा सहवास हें एक उदार शिक्षणच आहे.

**त्रिवेणी**—आतां परत चलायचेंना ?

**धुरंधर**—खरेंच, तूं थंडीनें कांकडून गेली असशील. ( तिला उठवितो. ) अरे, हें काय ? डोक्यावरून सारखें रक्त वहात आहे. विहिरींत दगड लागून डोक्याला खोंक पडलेली दिसते. मध्यंतरीं पाण्यामुळें रक्त थांबलें असावें. पण तें आतां पुन्हा जोरानें वाहूं लागलें. थांब, हा रुमाल ओला करून बांधतों. ( त्रिवेणीच्या डोक्यास रुमाल बांधीत ) उद्यां पहांटे लवकर उठून आपणां सर्वांस आरामबागेंत जावयाचें आहे. तेव्हां लवकर घरांत जाऊन आपणांस निघण्याची तयारी केली पाहिजे. शिवाय या गोष्टीचा कोणास संशय येऊं नये अशी तजवीजहि केली पाहिजे. तुझी खोंक केंसांच्या आच्छादनाखालीं झांकलेली असल्यामुळें ती कोणाला दिसणार नाहींच.

[ जातात.

---

# अंक तिसरा.

## प्रवेश पहिला.

[ यमुना व ह्माळसा. ]

**यमुना**—ह्माळसे, ताईत मीं ह्मटल्याप्रमाणें पहांटेच्या मुहूर्तावर गळ्यांत घातलास ना ?

**ह्माळसा**—अक्षी प्हाट बगा. संमदी मनुक्षं वाड्याभाईर पल्डी, आन् तवाच म्या ह्यो ताईत गळ्यामंदी घालून दिला.

**यमुना**—सारीं माणसें गेलीं का निघून आरामबागेंत ?

**ह्माळसा**—बाबासाब हतच हायती. यमुनाताई, मला योक लई मोटी आर लागलिया बगा.

**यमुना**—तुला असली कोणती काळजी लागली आहे ?

**ह्माळसा**—बाबासायबांनीं ह्यो ताईत पगितला, आन् त्ये मला आपली पोरगी ह्मनाया लागल, तर मंग ?

**यमुना**—वेडी कुठची ! अग, या ताइतानें त्यांजवर एकदां आपला प्रताप गाजविला आहेच; तेव्हां त्यांच्यासंबंधानें तो निरुपयोगीच झाला आहे. एका माणसावर त्याचा दोनदां अंमल चालत नाहीं, समजलीस ?

**ह्माळसा**—आतां पल्डा माजा जीव खाली. जर का त्येनी मला ताईसाब ह्मटलं असतं, आन् माजं लगानबी लावून दिलं असतं राजासंग, तर ताईसाब माज्यावर राग्याजल्या असत्या न्हव का ? आन् त्येनी माजी चाकरीबी काढूनशान् नसती का घ्येतली ?

**यमुना**—ह्माळसे, तें असूं दे. आतां कोणी श्रीमंत मनुष्य येऊन तुला जर आपली मुलगी ह्मणूं लागला, तर तूं काय करशील, सांग बरें ?

**म्हाळसा**—मी त्येच्या मांडीवर बसन, त्येच्या गळा पडन, आन् ह्मनन, बाबा, माज्या जल्माअदुगर भ्येटला व्हतास, त्येच्यावर आज पुना भ्येटलास; सोबतया न्हवं तुला ह्ये?

**यमुना**—ह्माळसे, तूं इतकी अजागळ असशील असें मला नव्हतें ठाऊक. तूं एवढी घोडमुलगी, आणि त्यांच्या मांडीवर का बसणार? आणि तुझी त्यांच्याशीं भेट तुझ्या जन्मापूर्वीं झाली, असें का ह्मणणार? वा ग! असें वेड्यासारखें बोलूं लागशील, तर ते तुला आपली मुलगी कबूलच करणार नाहींत.

**म्हाळसा**—मंग काय ह्मनूं ह्मनतां?

**यमुना**—ते तुला काकांपासून मागून घेऊं लागले, तर तूं त्या गोष्टीला आपली नाखुषी दाखविली पाहिजेस; आणि त्यांच्याबरोबर जाणार नाहीं असा हट्ट धरून बसलें पाहिजेस.

**ह्माळसा**—आन् त्येंबी त्येला व्हय ह्मनाल तर मंग?

**यमुना**—ते कबूल होणारच नाहींत. झाले तर ताइताचा प्रभाव तो काय?

**ह्माळसा**—आं, त्ये तर मी भुलल्येच व्हत्ये.

**यमुना**—मग मी जातें आतां. तूं अशीच येथें उभी रहा.

[ जाते.

**म्हाळसा**—( स्वतःशीं ) आतां माजा बा म्हून कोन येतुया, द्येव जान! त्येच्या मिशा इचवाच्या नांगीवानी अक्कडदार असत्याल, का कंगव्यावानी छप्परदार, का झेंडुवानी झुबकदार असत्याल? झुबकदार मिशा मला लई ग्वाड दिसत्यात. नग त्या इचवाच्या नांगीवानी मिशा! त्यो माजा मुका घ्याया ग्येला आन् त्येनी डंख मारला तर? कल्ले असल तर लईच नामी. कल्लेवाला लई शिरमंत दिसतुया. दाडी मातुर वंगाळ! येकांदा दाडीवाला माज्या त्वांडाम्होरं त्वांड आनील तर मेल्याची दाडी उपटूनशान हातामंदीच घेईन! अर, पन् ह्ये कोन? कोतवाल आन्

शिरपति ! ह्यो शिरप्या माजा बा व्हनार व्हय? मंग ब्येस. त्येनं माजा मुका घ्येतला तर मंग न्हाई न्हाई म्हनायची.

[ खंडेराव व श्रीपति येतात. ]

**खंडेराव**—( स्वतःशीं ) या झाइरातीनं तर लई गडबड उडवून-शान दिलीया. पारथिवराजानींबी मला पुसलं, कायर मसनवाटींत कोन कोन आलं व्हतं? आन् जवा का म्यां जोशीबुवाचं आन् त्या डोक्संवाल्याचं नांव सांगतलं, तवा त्येनी मला इनामबी दिलं. पंडत-म्हाराजबी म्हंगाल, येका न्हाई येकाच्या घरीं तायताची प्वार गवासल, तर मोटं इनाम देईन म्हून. आन बढतीबी घेनार हायती. ( उघड ) पोरा, तुला लिवाया येतया कायर?

**श्रीपति**—येतया वाईच.पन त्ये मोडीगिडी न्हाई येत,बाळबुद येतया.

**खंडेराव**—आपलं घरानं बाळबुद, तवा आपनास्नी बाळबुद लिवनंच व्होवं.

**श्रीपति**—पन त्ये मुंग्यावानी न्हाई येत. भोपळ्यावानी मोटंमोटं येतं.

**खंडेराव**—मंग त्येच्यामंदी काय सरम हाय! आपलं घरानं मोटंबी हाय, तवा लिवनंबी मोटं व्होवं. आतां तूं ह्ये कर. ल्ही येक मोठ्या मोठ्या अक्सराची झाइरात बाळबुदीमंदी, आन् द्ये न्येउन येकांद्या शेप-खान्यांत.

**श्रीपति**—पन काय बुवा लिवावं झाइरातींमंदी ?

**खंडेराव**—अर, काईबी चालल; पन सही मातुर येताळाची व्होवी. योका झाइरातीला दोन इनामं, आन् वर बडतीबी. अर ह्ये काय? हतं तर संमदं वसाड दिसतया. आन् घरामंदली मानसं काय जाली? या झाइरखबरीनं पळूनबिळून त न्हाई ग्येली? ही येक प्वार मातुर दिसतिया. हिलाच इचारून पगूं. पोरी, घर वसाड काग दिसतया? घर बांधत्यात त्ये र्‍हान्यापायीं का वसाड ठेयन्यापायीं ?

**म्हाळसा**—संमदी मानसं ग्येली हायती आरामबागमंदी. मी येकली आन् बाबासाब हायती घरामंदी. दुसरं कुत्रंबी न्हाई.

**खंडेराव**—मला प्यार व्होवी, बाबासाब नग.

**श्रीपति**—( स्वतःशीं ) घरामंदी चिटपाखरूबी न्हाई ह्ये लई ब्यास जालं. ( म्हाळसेस एकीकडे ) म्हाळश्ये, मी हतं आपन हून न्हाई आलों. बाबानीं आनलया. तुज्याच गळ्याच्यान्. अर इच्या ! ह्ये काय लाग-तया हत ? ह्यो तर ताईत. आन् ह्यो हत कंदी आला ?

**म्हाळसा**—आजपोतुर ह्यो व्हता दंडामंदी. आतां घातलाया गळ्या-मंदी.

**खंडेराव**—काय म्हनतुयास, पोरा ? ताईत हाय काय त्यो ? असल न्हाईतर गळसरी बिळसरी.

**श्रीपति**—गळसरी जस्ताची असती व्हय ? मला अजूनबी ख्येडगळ म्हंता जनु !

**खंडेराव**—जस्ताचाबी हाय म्हंतोस ? रुप्यागिप्याचा त न्हव ?

**श्रीपति**—मला येतं वळकाया जस्त आन् रुपं.

**खंडेराव**—( श्रीपतीस एकीकडे ) अर बिघ्या, त्ये जस्त असल तर त्येच्याम्होरं मला चांदीबी नग, आन सोनंबी नग.

**श्रीपति**—( एकीकडे ) ह्ये काय उपाटलं मंदीच ?

**खंडेराव**—पोरी, तूं माजी ल्येक. इक्त दिस व्हतीस कुटं ? तुज्या पायी मी अक्षी रोडावलुया पग. न्हाइ वळाकलंस मला अजूनबी ?

**म्हाळसा**—न्हाई म्या वळाकलं !

**खंडेराव**—तुला मी कडवर घ्येत व्हतों, आन् तू माज्या मिशाबी उपटत व्हतीस !

**म्हाळसा**—( एकीकडे) आतां मातुर उपटाया व्होव्या असं वाटतया.

**खंडेराव**—अजूनबी न्हाई वळाक पटली ? येक यिळा तू माज्या मांडीवर बसली व्हतीस आन्--

**म्हाळसा**—मी न्हाई कंदी मांडीगिंडीवर बसायची कुनाच्याबी, आन् मी असं कुनाला ब्वोलूबी द्यायची न्हाई.

**खंडेराव**—तुला कुठून याद न्हाती ह्मना ! तूं तवा होतीस इक्ती उच. ( हातानें दाखवितो. ) इक्त्या न्हानपनच्या गोष्टी कुनाच्या ध्येनामंदी न्हात्यात ?

**म्हाळसा**—मंग तुमच्या ध्येनांत बऱ्या न्हायल्या व ?

**खंडेराव**—मी तवा व्हतो मोटाच. आतापुनबी उच असन. संमदं आटवतया मला. तूंच माजी ल्येक. चल माज्यासंग घरीं.

**म्हाळसा**—मी न्हाई येनार, तुजी ल्येक असल तिला हटक जा.

**श्रीपति**—ह्माळश्ये, मीबी ह्मनतो आमच्यासंग चल म्हून.

**म्हाळसा**—तुजी भन म्हून व्हय ?

**श्रीपति**—माजी भन ?

**म्हाळसा**—ह्येची ल्येक ह्मंजी तुजी भन न्हाई तर कोन आजी ?

[ विश्वेश्वरशास्त्री प्रवेश करतो. ]

**विश्वेश्वर**—ही काय गडबड आहे ?

**खंडेराव**—बाबासाब, तुमी आतां आमच्या ह्माराजांच सासर व्हनार. तुमीच आमचा अन्याव करा. ही माजी ल्येक हाय. मी इला ह्मंतुया, माज्यासंग चल, ही ह्मंतिया न्हाई.

**विश्वेश्वर**—पण ही तुमची मुलगी कशावरून ? कांहीं खूण सांगाल कीं नाहीं ?

**खंडेराव**—हंग, ह्ये बरं इचारलं. मी हिला टाकली तवा खून ह्मनूनशानी हिच्या गळ्यामंदी ह्यो जस्ती ताईत अडकावूनशानी दिला व्हता.

**विश्वेश्वर**—( एकीकडे ) माझी शंका खरी झाली. त्रिवेणि, हें तुला कळलें ह्मणजे तूं प्राणच टाकशील. पण कळण्याची तरी जरूर काय ? कोतवाल जर ह्माळसेलाच आपली मुलगी समजताहेत, तर आपण तरी त्यांच्या आड कां या ! हें उघड यमुनेचें कारस्थान दिसतें आहे. ( उघड ) कोतवालसाहेब, तुमची जर हिच्याबद्दल खात्री झाली असेल, तर माझेंहि कांहीं ह्मणणें नाहीं. तुह्मी तरी उगीच भलत्याच मुलीवर खोटा हक्क कशाला सांगाल ? तुमची मुलगी तुह्माला मिळाल्याबद्दल मला



**खंडेराव**—बाबासाब, ह्ये इक्त लांब क्यास कागदामंदी मावत्याल? न्हाई मावल तर बुचडा करूनशान घाला, मंजी जालं. [ पृष्ठ ९३. ]

पावती द्या ह्मणजे झालें. त्या पावतींत हिच्या खाणाखुणाहि लिहून ठेविलेल्या बऱ्या !

**खंडेराव**—बाबासाब, तुमी काई झालं तरी शहानसुर्त गिरस्त. तुमी या अडानी प्वोरींवानी घासघीस न्हाई घालायच. आतां पावती ह्मंता तर त्ये मला हाय कबूल. पन माजा जेवना हात जरा दुखतुया. तवा ह्मंटलं तुमीच पावती लिवा; आन् मी तिच्यावर सही धेतो. मंग तर जालं न्हव ?

**विश्वेश्वर**—आणखी काय पाहिजे ! (पावती लिहूं लागतो.) हं, सांगा आतां हिच्या खुणा.

**खंडेराव**—पोरा, सांग बिगी बिगी तिच्या निशान्या.

**श्रीपति**—सांगतुया. ( ह्माळसेस एकीकडे ) ह्माळश्ये, तूं माजी भन हायस ह्ये मला कंदीबी न्हाई खरं वाटायचं. हत काईबी भानगड दिसतिया.

**खंडेराव**—पोरा, आतां घरीं गेल्यावर आपल्या भनीसंग बोलत बस न्होवं तिक्कं. हत नग लावूं आतां उशेर. प्वार बिचकून जाईल पुना येकांदी.

**श्रीपति**—परतम इचा ढवळा रंग लिवा, बाबासाब. मंग ह्ये काजळा-वानी काळ डोळ लिवा. रागूच्या चोचीवानी नाक लिवा. कमानी-वानी भिवयाबी लिवाया नका इसरूं. ह्यो हनुटीवरचा तीळ लिवा, आन् ह्यो गालावरचा तीळ, त्यो तर अदरून लिवा. हाय न्हान, पन अक्षी ग्वाड! चांदावरची तीट जनू !

**खंडेराव**—ह्यो तीळ आटवतुया मला. लई ग्वाड हाय ! अक्षी सक्रा-तीच्या तिळावानी !

**श्रीपति**—( एकीकडे ) आन् मी हात लावल्याबरूबर तिळावानी त्येच्यावर काटाबी उटला. (उघड) आन् ह्ये काळ गुडग्यापातुर लोंबत्यात.

**खंडेराव**—ह्येबी माज्या ध्येनांत हाय. न्हा...

पातुर व्हत. बाबासाब, ह्यो हक्त ...

न्हाई मावल तर बुचडा

**श्रीपति**—ह्ये गुलाबी गालबी लिवा.मातुर काळ्या शाईनं लिवूं नका. त्येला लालुंगी शाई व्होवी.

**खंडेराव**—शिरप्या, तूं तर त्वोंडावरच्या निशान्या सांगाया इक्ता योळ घ्येतलास. हिला हात पाय हायती का न्हाई ?

**विश्वेश्वर**—कांहीं जरूर नाहीं. पुरे झालें. करा सही. (कोतवाल सही करतो. पडदा पडतो. )

**भार्गव**—(प्रवेश करून स्वतःशीं) याच घरीं ताइताची मुलगी आहे, अशी बातमी यमुनेकडून मिळाली मात्र, आणि मी तावडतोब धांवतच आलों. माझी ताई दिसली, त्यामुळें डोळ्यांचें सार्थक झाल्यासारखें वाटतें. पण हिचा बाप ब्राह्मण असावा असा बाबांच्या मृत्युपत्रावरून माझा समज झाला होता, आणि हा कोतवाल तर आहे कुणबी. याचा मेळ कसा घालावा ? मृत्युपत्राचे वेळीं बाबा शुद्धीवर तरी नसावेत, किंवा या कोतवालानें आपली मुलगी आपल्या उपाध्यायाबरोबरच बाबांकडे पाठविली असावी. कांहीं असो. मीं जाहिरात दिल्यापासून चांगलाच उपयोग झाला. काल धुरंधरमहाराज स्मशानांत भेटले होते. तेव्हां त्यांचें मन गंगूबद्दल बरेंच विटलेलें दिसलें. तेव्हां आतां माझ्या ताईची त्यांजकडे गोष्ट काढायला कांहीं हरकत नाहीं. आमचे धुरंधरमहाराज विलायतेंत राहिल्यामुळें त्यांची जातीसंबंधानें फारशी तक्रार येणार नाहींच. कुणबी भाषेची आणि रीतीभातीची जरा अडचण आहे, ती थोड्या दिवसांच्या शिक्षणानें घालवितां येईल. आतां कसेंहि करून ताईची एकांतीं गांठ घेऊन तिला महाराजांच्या भेटीसाठीं तयार केली पाहिजे.

[ जातो.

---

## प्रवेश दुसरा.

**पार्थिव**—(स्वतःशीं) कोतवालानें सांगितलें, कीं स्मशानांत ज्योतिषीबुवा आणि तो मस्तकशास्त्री असे दोघेजणच होते. अर्थात्च या दोघांपैकीं

एकापाशीं ती ठेव असली पाहिजे.आतां पहिल्या प्रथम कोणाचें घर शोधावें बरें ? पण मला इतका विचार कशाचा पडला ? जोशीबुवा आजच पहांटे घरांतील साऱ्या मंडळीसह शहराबाहेर गेले आहेत असें कळतें; तेव्हां त्यांचेंच घर पहिल्यानें शोधावें, ह्मणजे आपणाला कोणाचा अडथळा येणार नाहीं. कोणीं विचारिलेंच, तर तोतयाच्या संशयावरून ज्योतिषी-बुवांच्या सामानाची झडती घ्यावयाची आहे,असें द्यावें सांगून झालें.आज आपली मोडकी जहागीर चांगली सांवरणार असें माझें मन साक्ष देत आहे. हा आलोंच कीं वाड्यापाशीं. अरे, हें काय ? आंत कोणी चिटपाखरूंहि नाहीं. हा विश्वेश्वरशास्त्री मोठा ऐदी बुवा ! दार लावून घ्यायचेंहि विसरला. पण त्याचा ऐदीपणा आपल्या पथ्यावरच पडला आहे. नाहीं तर नसता त्रास करावा लागला असता. ( इकडे तिकडे फिरून ) ही दिसते आहे पाहुण्यांची खोली. ही लोखंडी पेटी कोणाची असावी बरें ? संशय कशाला ? पेटीवरील हें नांवच त्या जोशाची मालकी दाखवीत आहे. आतां कुलपावर प्रयोग करूं या. ( कुलूप हत्यारानें काढून पेटी उघडतो. ) अरे, हें काय ? हीं उंची वस्त्रें दिसतात, आणि हे मोत्यांचे हार आणि कंठी. माझा तर्क निखा-लस खरा ठरला. हीच ती ठेव; आणि हिच्यावर माझीच मालकी आहे. कारण हल्लीं शहरांत मजवांचून दुसरा राजकुलीन आहे कोण ? धुरंधर तर अजून बंदरांतच आहे. हे कपडे ओळखीचे वाटतात. धुरंधराच्या चित्रांत होते तसेच हुबेहुब दिसतात. आणि हे चांद आणि हीं पदकेंहि त्याचींच, यांत संशय नाहीं. ( पेटीभोंवती पाहून ) अरे बापरे ! येथें हे रक्ताचे थेंब कोठून आले ? थेंबांची सारखी रांग लागली आहे. या रांगेचा उगम तरी किती दूर आहे हें पाहिलें पाहिजे. (जमिनीकडे पहात फिरतो. ) खास इथें कांहींतरी काळेंबेरें आहे. थेंबांचा माग काढीत हा मी अंगणापर्यंत आलों, तरी ते थांबतच नाहींत. ही रांग या विहिरीकडे गेली आहे. हा विहिरीचा कांठ. येथूनच थेंबांना सुरुवात झाली हें उघड आहे. ज्याअर्थी या वस्तु धुरंधराच्या, त्याअर्थी

हें रक्तहि त्याचेंच यांत तिळप्रायहि शंका नाहीं. बरें, पण धुरंधर असा एकटा या ठिकाणीं आला तरी कसा ? त्या जाहिरातीनेंच त्याला येथें आकर्षून आणिलें खास. तिनें मलाहि दोन दिवस वेड लाविलें होतें. धुरंधरा, एक तोतया तुझी गादी बळकावयाला टपला आहे, हें माहीत असतांना तूं आपले प्राण संकटांत कां घातलेस ? त्या तोतयाचेंच तर हें कारस्थान नसेलना ? हो, त्याचेंच दिसतें. आणि तो ढोंगी ज्योतिषीच तोतया. कारण, मी धुरंधरासारखाच दिसतों का, असें त्यानें आपल्याला विचारलें होतें, असें कोतवाल काल ह्मणत होता. अरे दुष्टा, विश्वास-घातक्या ! शेवटीं आपला डाव साधलासच ना ? डाव साधून पळून जाण्याचा तुझा बेत आहे. पण आतां पळशील किती ? हा पार्थिव तुझा कुत्र्यासारखा पाठलाग करून तुला न्यायासनासमोर खेंचून आणतो. प्रयागपंडितांकडे जाऊन त्याला पकडण्याचा हुकूम आधीं हस्तगत केला पाहिजे.

[ जातो.

---

## प्रवेश तिसरा.

[ ह्माळसा व श्रीपति. ]

**श्रीपति**—ह्माळश्ये–ह्माळश्ये–

**ह्माळसा**—काय ह्मंतोस, शिरपतिभाऊ ?

**श्रीपति**—ह्माळश्ये, हात जोडतुया तुला. पन मला ह्ये वंगाळ भाऊ भाऊ ह्मनू नग.

**ह्माळसा**—आजपोतुर तूंच न्हवता का ह्मंगत, तुजं माजं अक्षी जवळचं नातं व्होवं म्हून. तूंच सांग, भावापुन जवाळचं नातं कुटलं? मी तुज्या पाटचीं भन दिसत्ये खरी.

**श्रीपति**—पिरतीन तुला पोटाशी धराया जातु, आन् तू ह्मंतीस मी पाटची म्हून ! तुजी माजी पिरीत कोनाला पगवना म्हून त्येन हा

संमदा बरमध्वाटाळा क्येलान् काय ! त्ये समदं दिसतया त्या गंगूबाईचं कारस्तान. अग गंगूबाई, आमच्या खऱ्या पिरितीमंदी तू बिब्बा घातला-यास, तर तुज्या मनावानी तुलाबी राजा दादला न्हाइ गवसायचा !

**ह्माळसा**—अर, गप. त्यो पग माजा बा आन् दुसरा कोनसा येतुया. भाईर जा. (श्रीपतीला बाहेर ढकलिते. खंडेराव व प्रयागपंडित येतात.)

**प्रयाग०**—तुह्मी जेव्हां तिजवरचा आपला हक्क दाखविला, तेव्हां ती मुकाट्यानें तुमच्याबरोबर यायला कबूल झाली का ?

**खंडेराव**—न्हाई जी सरकार, अक्षी वाघनीवानी आली चवताळून माज्या अंगावर पगा.पन मंग जवा बाबासाब आल, आन् त्येनीं माज्यावानी तीबी कुनबट हाय ह्मनुन ह्येरलं, तवा त्येंचीबी खातरी जाली.

**प्रयाग०**—काय ह्मणतां ? तिची भाषाचर्या कुणबटासारखीच आहे ?

**खंडेराव**—कुनबट मंजी अक्षी वंगाळ असं आपलं ह्मननं हाय व्हय, सरकार? आमी कुनबटं श्येतामंदी राबतो तवा बामनास्नी भाकुर मिळती ! त्ये कशाला,सरकार ! पिरथमीच्या पाटीवर कुनबटं नसती तर बामनास्नी बामन कोन ल्योक ह्मननार व्हता ?

**प्रयाग०**—खंडेराव, असे रागावूं नका. तुमचा उपमर्द करण्याचा कांहीं माझा हेतु नव्हता.

**खंडेराव**—आनीबी वाईच बोलतो त्येची मापी करावी, सरकार. आमची कुनबी बोली बामनाच्या बोलीपुन वंगाळ कां म्हुन लागतीया ? ती शाळमंदी पोरास्नी पडवीत न्हाइत, आन् तिच कुनी याकरनबी करीना ह्मनून. याकरन असतं आन् तिच्या पोत्या लिवल्या असत्या, मंजी मंग तिला कोनीबी वंगाळ ह्मनाया ग्येला नसता.

**प्रयाग०**—खंडेराव, माझी मुलगीच जर कुणबी भाषा बोलत आहे, तर मी तरी तिला वाईट कसें ह्मणेन ? तुह्मी विनाकारण इतके रागावलांत.

**खंडेराव**—ही पगा आपली ल्येक, सरकार.

**ह्माळसा**—ह्यो आनिक योक माजा बा होऊनशान आलाया.मानसाला दोनदोन बा असत्यात जनु !

**प्रयाग०**—हिचे नाकडोळे बऱ्यांपैकीं आहेत खरे. पण माझी मुलगी हिच्यापेक्षां बरीच सुरेख असेल, असा माझा समज होता.

**खंडेराव**—गरीबीचं न्हानं आन् उनातानामंदी हिंडनं पलुडं झंजी असंच हुयाचं.

**प्रयाग०**—तुह्मी ह्मणतां तसेंहि झालें असेल. मी त्वेषाच्या झटक्यांत जो प्रमाद करून गेलों,त्याचीं फळें माझ्या मुलीला भोगावीं लागत आहेत. देवा! माझ्या मुलीनें असा कोणता अपराध केला होता, कीं माझ्या पापाचें प्रायश्चित्त तिनें भोगावें? बाळे, तुझें नांव काय?

**म्हाळसा**—मला ह्माळसा ह्मनत्यात.

**प्रयाग०**—उद्यां आपण तुझें नांव बदलून तुला महालसा ह्मणूं.

**म्हाळसा**—मंजी मला पालन्यामंदी घालायचा इचार दिसतुया. नग मला त्ये. तुमचं व्होवं तर बदला, पन माजं नांव न्हाई मी बदलूं द्येनार.

**खंडेराव**—सरकार, इची मिजास सरकारावानीच कडक दिसतिया.

**प्रयाग०**—( एकीकडे ) हा शिक्षणाच्या अभावाचा परिणाम. (उघड) बरें, मुली, तुला खायलाप्यायला काय पाहिजे तें सांग; ह्मणजे तशी व्यवस्था करितां येईल.

**म्हाळसा**—आज सकाळपुन मला पुऱ्यान् बासुंदीच खाया द्येल्याती.

**प्रयाग०**—मींच ती व्यवस्था केली होती.

**म्हाळसा**—त्येनं मला अक्षी वकारी आलिया. वाइच भाकर आन् लसन्नाचं तिकाट धाडूनशानी द्याल, तर लई ब्येस व्हईल पगा.

**प्रयाग०**—( एकीकडे ) हिची रुचिसुद्धां कायमची बदलून गेली! ( उघड ) बरें, नेसायला हें जरीकांठी पातळ पाठवून दिलें होतें, तें तरी पसंत पडलें का तुला?

**म्हाळसा**—इरिरित चिंदीवानी त्ये तवाच फाटून ग्येलया. पातळ न्येसा, आन् द्येवावानी बसा, त्ये कुनाला व्होवं?

**प्रयाग०**—बरें, अंथरुणापांघरुणांची व्यवस्था तरी तुझ्या मनासारखी झाली आहे का ?

**म्हाळसा**—मला नग ह्यो पिंजरा. मला मुलूकभर लोळाया व्होवं. त्येच्यावर मगा मी जरा लवंडल्ये आन् बदाबदा खाली पल्ड्ये. अन ह्ये घोंगटबी मला नग. त्येच्यामंदी शिरन तर वा पिसा ढ्येकन कंदी न्हवती मला चावाया लागत्याल.

**प्रयाग०**—( एकीकडे ) हिच्यासारख्या रानवट पोरीला अशा विलासांची काय किंमत ! (उघड) बरें, म्हाळसे, तो ताईत जरा पाहूं दे बरें मला ?

**म्हाळसा**—आन् त्यो तुमी मला परत दिला न्हाई तर ?

**प्रयाग०**—म्हाळसे,माझा विश्वास नाहीं तुला? मी तुझ्याकरतां हजारों रुपयांचा खर्च करायला तयार आहें, तो तुझा दीडदमडीचा ताईत पळवून नेईन ?

**म्हाळसा**—मला न्हाई कुनाचा इस्वास.

**प्रयाग०**—बरें, मीं तुला जर या ताइताच्या किंमतीच्या दसपट मोबदला दिला, तर तूं तो मला देशील ?

**म्हाळसा**—मंग पगीन.

**प्रयाग०**—हें घे. (तिला बक्षीस देतो व ती त्यास ताईत देते. स्वतःशीं) यांत मीं ठेविलेली खूण सांपडून ही नीच मनोवृत्तीची मुलगीच माझी मुलगी ठरणार का ? ( ताईत उघडतो. स्वतःशीं ) अरे, ताईत तर अगदींच रिकामा आहे.यांत ती खूण नाहीं, तर ही माझी मुलगीहि नाहीं. मुलगी न सांपडल्यामुळें मला आनंद झाला, असा आजच हा प्रथमतः! ( उघड ) मुली, हा तुझा ताईत संभाळ. जातों मी. ( तिला ताईत परत देतो. )

**म्हाळसा**—बोलवाया कोन आल व्हत ? जातु म्हन !

**प्रयाग०**—( खंडेरावास एकीकडे ) कोतवाल, ही खास माझी मुलगी नाहीं. हिच्यामध्यें कृतघ्नपणाचा अंकुर असून हिला प्रत्येकाचा अवि-

श्वास वाटतो. यांपैकीं एकहि दुर्गुण माझ्या कुटुंबांत नव्हता, आणि मज-मध्येंहि नाहीं. सदभिरुचीचा अभाव, ग्राम्य भाषा व संवयी या परिस्थिती-मुळें अंगीं येतील. पण कृतघ्नपणा व संशयीपणा हे दुर्गुण आनुवंशिकच असावयाचे. या ताइतानें तर खात्रीच झाली.

**खंडेराव**—( एकीकडे ) माजं इनाम आन् बढती दोनींबी इरगळून ग्येली !

**पार्थिव**—( प्रवेश करून ) पंडितमहाराज, घात झाला. आपल्या धुरंधरमहाराजांचा एका ज्योतिष्यानें कपटानें वध केला आहे. त्याला पकडण्याकरितां मला आपल्या सहीचा हुकूम पाहिजे आहे. मी प्रथम आपल्या वाड्यांत गेलों होतों. पण आपण येथें आहांत असें कळल्यावर घोडा दामटीत इकडे आलों आहें.

**प्रयाग०**—पार्थिवराज,तुह्मी उन्हांतून आल्यामुळें तुमचें मस्तक भ्रम-लेलें दिसतें. जरा विश्रांति घ्या, आणि मग बोला.

**पार्थिव**—नाहीं हो,ही विश्रांतीची वेळ नाहीं.थोडा उशीर झाला तर त्या भामट्याला पळून जावयाला चांगलेंच फावेल.

**प्रयाग०**—बरें आहे. आंत चला. तुमची हकीकत ऐकून घेतों, आणि जरूर वाटल्यास तुह्माला हुकूम देतों. परंतु त्याबरोबरच महाराज बंदरांत नाहींत कीं काय याचा राणीसाहेबांकडून खात्रीलायक खुलासा मागविला पाहिजे, आणि तोहि त्यांना या भयंकर प्रकाराचा सुगावा न लागेल अशा युक्तीनें. एवढ्याकारितां तुह्मी प्रथम एक खुद्द महाराजांच्या नांवचें, व दुसरें राणीसाहेबांच्या नांवचें, अशीं दोन पत्रें लिहा. महा-राजांच्या पत्राचें उत्तर ताबडतोब खुद्द त्यांच्याच हातचें यावें, अशी राणीसाहेबांना पाठवावयाच्या पत्रांत विनंति करा. पत्रें तुमच्याच हातचीं असल्यामुळें राणीसाहेबांना त्याविषयीं कसलाहि संशय न येतां महा-राज बंदरांत आहेत कीं नाहींत याचा त्यांजकडून नक्की पत्ता लागेल. कोतवाल, ताबडतोब एक हलकारा आईसाहेबांकडे पाठवा.

[ प्रयाग, पार्थिव, व कोतवाल जातात.

**भार्गव** (प्रवेश करून स्वतःशीं)—सर्व मंडळी निघून गेली एकदांची. आतां ताईची एकांतांत गांठ घेतां येईल.

**यमुना** ( प्रवेश करून स्वतःशीं )—स्वारी घरून निघाली तेव्हांच मला वाटलें, कीं आपल्या प्रियकरणीची भेट घ्यायलाच निघाली आहे. बसा ह्मणावें आतां आपली हेंगाडी प्रिया घेऊन.

**भार्गव**—ताई—

**यमुना**—(एकीकडे) ह्मणजे ? हे हिला बहीण समजतात कीं काय ?

**ह्माळसा**—ह्यो कोन मला ताई म्हून हटकतुया ? आज सकाळपुन बा अन् भाऊ येंची अक्षी लूट चाललिया ! कुनीकडबी पगा, येकांदा बा म्हना भाऊ ह्मना न्हायलाच ह्मोर येऊन उबा. हीं कवाड आन् बाऱ्याबी समद्या लावुनशानी टाकुया. न्हाईतर येकांद्या फटीमदनं येकांदा बा न्हाई-तर येकांदा भाऊ उडी मारून आमंदी घुसायचा !

**भार्गव**—ताई, किती वर्षांनीं तरी तुझी गांठ पडली ! तुझी माझी कायती एका दिवसाचीच संगत. पण तेवढ्यांत तूं माझें मन आपलेंसें करून टाकलेंस. मी जेव्हां तुला कडेवर आणि खांद्यावर घेऊन खेळवलें, तेव्हां तूं माझ्यापासून दूर देखील होईनास.

**ह्माळसा**—तुमीबी मला कडवर आन् खांद्यावर घ्येतलय ह्मनतां ? येकाच यिळला दोगादोगांनीं घ्येतलं, त्ये का माजी पालकी क्येली व्हती व्हय ? तुमी संमदीजनं मला कडवर घ्येऊन थकला का भागला, ह्ये मला न्हाइ ठावं ! पन माजं प्येकाट मातुर तुमच्या कडवर बसबसून अक्षी मोडून ग्येलं पगा !

**भार्गव**—तुला आजपर्यंत फार श्रम झाले. पण ते सारे दूर होण्याचा समय अगदीं जवळ आला आहे. तुझें लग्न लवकरच एका महाभाग्य-शाली पुरुषाशीं लागावयाचें आहे. आणि नंतर तुला उत्तम शिक्षणहि मिळेल.

**ह्माळसा**—काय ह्मटलंत ? सिक्सन ?

**भार्गव**—हांय, शिक्षण.

**म्हाळसा**—आन् सिक्सन त्ये काय असतं ?

**भार्गव**—शिक्षण म्हणजे लिहायला वाचायला येणें आणि जगांतील सर्व उपयुक्त वस्तूंचें ज्ञान प्राप्त होणें.

**म्हाळसा**—बस, इक्तंच ? त्येचं जखनीबरूबर काईबी नातं न्हाई म्हनतां ?

**भार्गव**—तिच्याशीं त्याचा अर्थाअर्थी कांहींच संबंध नाहीं. हें जें तुझें अज्ञान आहे, तें सारें शिक्षणानें जाईल.

**म्हाळसा**—मंग त्येचा अरूथ ठावा न्हवता त्येच बरं व्हतं.

**भार्गव**—आज संध्याकाळीं तुझ्या भावी पतीची व तुझी गांठ घालून देतों; त्या वेळीं तूं तयारीनें रहा म्हणजे झालें.

**म्हाळसा**—न्हाईन. पन मंग लिवायला आन् वाचायला न्हाई शिकायची–शाप सांगून ठ्येवत्ये.

**भार्गव**—तें पुढें पाहतां येईल. मी जातों तर. (स्वतःशीं) माझी ताई जरी कुणब्यांत वाढलेली आहे तरी तिचें तेज कांहीं लपत नाहीं. तिची भाषा कुणबी खरी, पण तिच्यांतहि मराठीची ढब बरीच दिसून येते. हिचें स्वतःच्या गुणांबद्दल जें पूर्ण अज्ञान आहे, तें चांगल्या सुशील मुलीसहि शोभण्यासारखें आहे. पण धुरंधरमहाराज हिच्याकडे माझ्याच दृष्टीनें पाहतील का ? कांहीं होवो ! प्रयत्न करण्याचा मीं निश्चय केला आहे. यश देणार तो परमेश्वर आहे.

[ जातो.

**यमुना**—आतां येथें रहाण्याचें मलाहि कारण नाहीं. [ जाते.

**म्हाळसा**—(स्वतःशीं) इक्ता येळ बानी भावानी लई लई भंडावलं. आज सांजच्या पारीं मला दादला पगायाला मिळनार, ह्ये त्येच्यापुनबी ठीक. ह्यो पिंजरा, ह्ये घोंगट, ह्ये बा आन ह्ये भाऊ संमद्यानीं मला येडावून सोल्ड. आन् ह्ये समदं या तायतापायीं. द्येवा त्यो तोडूनशानी लांब भिरकावून ! पुर जाला ह्येचा परताप ! पन कां टाका ? ह्येच्यापायी

लई पैका मिळल. असूं द्यावा जालं.यमनाताई हत येऊन परत मांगत्याल तर मंग पगाया येईल.

[ जाते.

---

## प्रवेश चवथा.

[ वाराणशी, त्रिवेणी, आणि धुरंधर. ]

**वाराणशी**—पाहिलात का जोशीबुवा, आजपर्यंत घरांत कसा भ्रष्टाकार माजला होता तो ? थोडींथोडकीं नाहींत, पुरीं सत्रा वर्षें आमच्या घरांत शूद्रांचा विटाळ बोकळला होता बरें. आणि या कारटीच्या हातचें अन्न तिकडे फार गोड वाटे. भोगा ह्मणावें आतां आपल्या लाडांचे परिणाम ! आतां प्रायश्चित्त तरी मिळेल कीं नाहीं कोणास ठाऊक ! हा सारा कलीचा प्रभाव बरें—कलीचा प्रभाव !

**धुरंधर**—बाईसाहेब, ही जातीनें शूद्र, असें अजून खात्रीनें ठरलें तरी आहे का ?

**वाराणशी**—ठरायला शिंगें का असतात? अहो, तिचें मनसुद्धां तिला खायला लागलें, आणि तिनें आपण होऊन स्वैयंपाकापाण्याला शिवायचें सोडून दिलें. तसेंच कांहीं असल्यावांचून ती बरी दूर राहूं लागेल ?

**धुरंधर**—थोडासा पुसट पुसट संशय येतांच आपला उपसर्ग तुह्मांला न पोहोंचेल अशा तऱ्हेचें ही वर्तन ठेवूं लागली, यांत तिचा उदारपणा मात्र दिसतो.

**वाराणशी**—उदारपणा ह्मणजे केवढा ! त्यापुढें आभाळसुद्धां ठेंगणें दिसूं लागलें ! हिचे उपकार आह्मांला आणखी किती दिवस भोंवतात देव जाणे ! आमचें घराणें ह्मणजे किती लौकिकवान ! सरकारदरबारीं तरी तिकडे केवढा मान ! आणि हें सारें एका दिवसांत मावळून आह्मांला खालीं मान घालण्याचा प्रसंग आला आहे. या कारटीच्या उपकारांचा संसर्ग आमच्या गंगूच्या लग्नाला न लागो

ह्मणजे मिळविली. धुरंधरमहाराज तसे शहाणेसुतें आणि सुधारलेले आहेत ह्मणून बरें आहे. नाहीं तर त्यांनीं ही गोष्ट ऐकतांच आमचें नांव टाकलें असतें.

**धुरंधर**—हिला आलेला संशय जर खरा असेल, तर त्यामुळें हिचें स्वत:चेंहि किती तरी नुकसान झालें आहे ! महाराजांनीं हिची निवड करण्याचा बराच संभव होता.

**वाराणशी**—आमच्या गंगूपुढें हिचें तेज पडलें असतें ह्मणतां ? जोशीबुवा, तुह्माला परीक्षाच नाहीं असें ह्मणावें लागतें. त्यांचेंहि मत असेंच चुकलेलें. अलीकडे पुरुषांमध्यें देखणेपणाची पारख राहिली नाहीं, हेंच खरें.

**धुरंधर**—सगळ्या पुरुषांचीच नजर चुकली ह्मटलें, तर महाराज तरी अपवाद कां होतील ?

**वाराणशी**—तुह्मी ह्मणतां तेंहि खरें आहे. या दिवसांत कुणीं कुणाचा नेम सांगावा ? अलीकडे पुरुषांना देखणेपणापेक्षां नट्टापट्टाच आवडतो. आमच्या गंगूला तर नटणेंमुरडणें मुळींच नको. तिचें नशीब थोर, ह्मणून तिच्या वाटेंत जो एक मोठा कांटा होता, तो आपोआपच दूर झाला.

**धुरंधर**—त्रिवेणीच्या दुर्दैवानें तुह्माला समाधानच झालें तर ?

**वाराणशी**—खऱ्याचा जय झाला, ह्मणजे कुणाला नाहीं समाधान वाटत ? तुह्मी किनई जोशीबुवा, त्रिवेणीचे पक्षपाती आहांत. तुह्माला माझें हें बोलणें रुचणार नाहीं. मी इथून जातेंच कशी. तुह्मी आणि तुमची लाडकी त्रिवेणी खुशाल गुलगुल बोलत बसा. माझी मेली अडचण मध्यें पाहिजे कशाला ?

[ जाते.

**धुरंधर**—त्रिवेणि, या कैदाशिणीनें तुझ्यासंबंधानें केलेलें तारांगण ऐकलें ह्मणजे असें वाटूं लागतें, कीं तूं स्वत:ला आलेला संशय तिला सांगितलास ही तूं चूकच केलीस.

**त्रिवेणी**—माझा संशय जर त्यांना कळविला नसता, तर त्यांच्याशीं विश्वासघात केल्यासारखें नसतें का झालें ?

**धुरंधर**—तूं आपल्या धर्मानें वागायला गेलीस खरी, पण त्याची तिला काय किंमत ! खरोखर ब्राह्मणज्ञातीचे असले मासले पाहिले ह्मणजे शूद्र ही सन्मानाची पदवी वाटूं लागते ! पावित्र्य, भूतदया, औदार्य या गुणांमुळें जर ब्राह्मण्य ठरवायचें असेल, तर तूं अतिश्रेष्ठ ब्राह्मण ठरशील; आणि या गुणांचा गंधहि नसलेली ती वाराणशी अत्यंत कनिष्ठ शूद्र ठरेल. पण ज्याअर्थीं आपल्या विसंगत वर्णव्यवस्थेंत तिचा ब्राह्मण या पदावर हक्क पोंचतो, आणि ज्याअर्थीं तूं गुणांनीं तिच्या अगदीं उलट आहेस, त्याअर्थीं शूद्र ह्मणवून घेण्यांतच तुझा बोज राहणें शक्य आहे. तूं शूद्र ह्मणवूं लागल्यापासून सर्व वर्णांची उलटापालट झाल्यासारखी मला वाटत आहे. आणि शूद्र या वर्णाबद्दल मला इतका आदर वाटत आहे, कीं मलाहि शूद्र व्हावेंसें वाटूं लागलें आहे. तूं ज्या वर्णांत असशील, तो वर्ण तुझ्या संसर्गानें पवित्रच आहे. त्रिवेणि, कृपा कर, आणि मला दीक्षा देऊन आपल्या वर्णांत प्रविष्ट कर.

**त्रिवेणी**—महाराज, आपण उदारपणानें ज्या गोष्टीची सूचना करीत आहांत, ती गोष्ट आपल्या हातून घडल्यास आपणावर समाजाकडून केवढें संकट येईल, याची आपणास कल्पना तरी आहे का ? आपले स्नेही आपलें दर्शन चुकवूं लागतील. आपले सगेसोयरे आपल्या वाऱ्यासहि उभे राहणार नाहींत. फार काय, पण ज्यांनीं आपणास जन्म दिला, तींसुद्धां आपलें मरण इच्छूं लागतील. याप्रमाणें सारें जग आपणाला दूर करील.

**धुरंधर**—माझ्या त्रिवेणीनें मला जवळ केल्यावर जगानें दूर केल्याची मला काय पर्वा वाटणार आहे ? लोकांनीं मजवर निंदेचा भडिमार जरी केला, तरी तुझ्या मंजुळ प्रणयवचनांच्या नादांत तो

मला ऐकूंहि येणार नाहीं. त्यांनीं मजवर कितीहि क्रोधकटाक्ष फेंकिले, तरी तुझ्या नेत्रांच्या तेजापुढें ते फिक्के वाटतील. त्यांनीं मजवर आगीचा वर्षाव जरी केला, तरी तो तुझ्या स्पर्शामुळें शीतलच वाटेल. त्यांनीं मजवर घाणेरड्या कर्दमाची वृष्टि केली, तरी तुझ्या सुगंधी श्वासामुळें ती मला चंदनाच्या उटीप्रमाणेंच भासेल. फार काय, पण त्यांनीं माझें अन्नपाणीहि जरी बंद केलें, तरी मी तुझ्या प्रेमरसाचें पान करून आपली क्षुधा व तृषा भागवीन.

**त्रिवेणी**—हें आपणाला या घटकेस वाटतें खरें. पण एकदां समाजाकडून छळ सुरू झाला, ह्मणजे तो आपणावर ओढून आणणाऱ्या स्त्रीचा आपणाला तिटकारा मात्र येईल.

**धुरंधर**—तसाच अनुभव आला, तर मी उलट समाजावर बहिष्कार घालून अरण्यांत राहीन. तुझ्या सहवासांत मला अरण्यहि शहराप्रमाणें वाटूं लागेल, पण तुझ्या विरहांत शहरहि अरण्यासारखेंच होईल. आणि त्या अरण्यांत माझा शोक अरण्यरुदितवत् फुकटच जाणार. त्रिवेणि, करणारना तूं मला जवळ? अंत:करणांनीं आपण आधींच एक आहोंत; जशीं अंत:करणांनीं तशींच शरीरांनींहि एक होऊं या. बाह्यांग आणि अंतरंग यांमध्यें असा विरोध कशाला? (त्रिवेणी धुरंधरास आलिंगन देते.)अहाहा! त्रिवेणि,तूं मला धन्य केलेंस. आतां समाज मला दूर करील, तर खुशाल करूं दे ! कारण सामान्य वल्लभांना दुष्प्राप्य असा एकांत त्यामुळें तरी आपणांस प्राप्त होईल. पण ही चाहूल कसली ऐकूं येत आहे? अरेरे ! दैवाला आमचें सुख पाहवेना हेंच खचित !

[ पार्थिव, खंडेराव व श्रीपति प्रवेश करतात. ]

**पार्थिव**—कोतवाल, आपल्या संस्थानाची महाराजांच्या वधामुळें किती तरी हानि झाली आहे!

—लई वंगाळ जालं, सरकार.



धुरंधर—मीं ? आणि महाराजांचा खून करणार ? [ पृष्ठ १०७. ]

**पार्थिव**—आतां मागाहून वारस मीच होणार, नाहीं का ?

**खंडेराव**—व्हय धनीसाब, आपुनच. दुसर कोन ?

**पार्थिव**—हें संस्थान किती कोटींचें आहे ?

**खंडेराव**—चार क्वोटीच.

**पार्थिव**—मग उत्तम झालें. पण माझा धुरंधर गेला, ही गोष्ट किती शोचनीय झाली ! पण त्याचें राज्य आतां मलाच मिळणार याचा आनंद पोटांत मावत नाहीं. पण तें राज्य तो मेल्यामुळें मिळणार याचें दुःखहि पोटांत मावत नाहीं !

**खंडेराव**—( एकीकडे ) ह्योंच्या प्वाटामंदी मावनार तरी काय काय ? त्ये आतां फुटून जानार !

**पार्थिव**—जोशीबुवा, आपला चतुर्भुज होण्याचा विचार होता वाटतें ? आह्मी तो विचार पूर्ण करायलाच आलों आहोंत. हा पहा आपणास पकडण्याचा हुकूम.

**धुरंधर**—मला पकडणार ? आणि कोणत्या गुन्ह्याकरितां ?

**त्रिवेणी**—आपली कांहींतरी चूक झाली असली पाहिजे.

**पार्थिव**—चूकबीक कांहीं नाहीं. विश्वेश्वरशास्त्र्यांच्या घरीं राहणारे ज्योतिषी तुह्मीच ना ?

**धुरंधर**—होय मीच. पण मला अजून गुन्हा कळला नाहीं.

**पार्थिव**—गुन्हा फार मोठा आहे.धुरंधरमहाराजांचा तुह्मीं खून केला आहे.

**धुरंधर**—मीं ? आणि महाराजांचा खून करणार ? ( हंसतो. )

**खंडेराव**—जोशीबुवा, ह्ये काम हसून साजरं करायचं न्हव.

**त्रिवेणी**—(एकीकडे) काय? महाराजांचा खून झाला? ( उघड ) अहो ! महाराजांचा खून झाला असेल, तर ती फारच वाईट गोष्ट झाली खरी; पण ती यांच्यासारख्या कोमल हृदयाच्या पुरुषाकडून घडली असें कसें ह्मणतां ?

**खंडेराव**—बाई, ह्येचं कवळं काळीज तुमाला ठावं अस
न्हाई ठावं. जवा मी तुमच्याकड आलो व्हतो, तवा ह्यो न
मी राजावानी दिसतो का न्हाई दिसत म्हून ?

**त्रिवेणी**—एखादा पुरुष राजबिंडा असला आणि त्यानें
दाखविलें, ह्मणजे त्यानें राजाचा खून केल्यासारखें होतें क

**धुरंधर**—( स्वतःशीं ) हिची मजवरची प्रीति अ
कसोटीला लावण्याची ही चांगली संधि आली आहे. तेव्हां स
ओळख देऊं नये हेंच बरें.

**पार्थिव**—विचार कसचा करतां जोशीबुवा ? हातावर
असतील, तर तें शक्य नाहीं.

**खंडेराव**—बऱ्या ब्बोलानं स्वाद्यान व्हता का दावूं हि

**धुरंधर**—शौर्य दाखविण्याची हौसच असेल, तर तीं ह
मी तयार आहें. (खंडेराव मागें सरतो.) पण त्याची इतकी ज
हा मी आपण होऊन तुमच्या स्वाधीन होतों. आणि या ब
कांहीं जरूरी नाहीं. मी पळून जाणार नाहीं असें वचन दे

**खंडेराव**—शिरप्या, घ्ये याल्ली आपल्या कबज्यामंदी.

**त्रिवेणी**—अहो, ते अगदीं निरपराधी आहेत ! सोडा
कां रे असा निष्ठुर झालास ? ( मूर्च्छित होते. )

[ वाराणशी व गंगू धांवत येतात. ]

**वाराणशी**—कोण ओरडलें ? झालें तरी काय ?

**पार्थिव**—जोशीबुवांना पकडल्यामुळें त्रिवेणी मूर्च्छित
कांहीं नाहीं.

**वाराणशी**—जोशीबुवांना पकडलें हें खासें झालें ! मल
असें कांहीं तरी होणार ह्मणून ! यांचा गुन्हा कोणता ?

**पार्थिव**—यानें धुरंधरमहाराजांचा वध केला. तोतय
हाच. यानें गादी मिळविण्याची खटपट केली, पण ती मिळ

**वाराणशी**—महाराजांचा वध झाला ? आणि लग्न होण्यापूर्वीच ? फार वाईट झालें. गंगू, तुझ्यावर बाई आभाळच कोसळलें!

**गंगू**—इतर प्रजाजनांप्रमाणें मलाहि दुःख होतें. पण पार्थिवराज, त्यांतल्यात्यांत आपण राज्याचे मालक होणार, ह्मणून आपलें अभिनंदन केल्यावांचून राहवत नाहीं.

**धुरंधर**—(एकीकडे) काय पहा स्त्रियांची जात! पण त्रिवेणीहि त्याच जातींपैकीं आहे, हें मला लक्षांत ठेविलें पाहिजे.

**पार्थिव**—गंगू, मी तुझें बोलणें ऐकून आश्चर्यानें थक्क झालों आहें. घडलेल्या प्रकाराबद्दल मीं तुझें सांत्वन करायचें, का तूं माझें अभिनंदन करावयाचें ? शिवाय आजपर्यंत तूं मला तुच्छतेनेंच वागविलेंस, आणि आजच माझें अभिनंदन करण्याइतका उमाळा तुला कुठून आला ? तुझें वर्तन पहा, आणि या त्रिवेणीचें पहा! बिचारी अजून मूर्च्छितच होऊन पडली आहे. अहो, कोणी हिला सावध करा.

( गंगू त्रिवेणीला वारा घालते. )

**वाराणशी**—गंगू, ही शूद्र आहे हें लक्षांत असूं दे. तुला विटाळ होईल एखादा.

**पार्थिव**—ही शूद्र आहे ह्मणतां ?

**वाराणशी**—हो, असें आह्मांला नुकतेंच कळलें.

**पार्थिव**—कांहीं हरकत नाहीं. शूद्र झाली, तरी कांहीं ब्राह्मणांपेक्षां शतपट बरी! हं, कोतवाल, कैद्याला नेऊन त्या गाडींत बसवा. आह्मीहि दुसऱ्या गाडींतून येतोंच.

[ जातात.

---

# अंक चवथा.

---

## प्रवेश पहिला.

[ भार्गव व यमुना. ]

**यमुना**—( स्वगत ) जोशीबुवांना खुनाच्या आरोपावरून पकडलें आहे, हें मला जरी गंगूताईच्या निरोपावरून कळलें, तरी तें अजून यांना माहीत नाहीं. तें कळल्यापासून यांना फारसें वाईटहि वाटणार नाहीं. कारण यांचें त्यांचें परस्परांकडे कधीं जाणें येणें नसून उलट त्यांच्याबद्दल यांच्या मनांत धंद्यासंबंधानें वैमनस्यहि असलें पाहिजे. पण आपण ज्या मुलीच्या शोधांत होतों, ती मुलगी झाळसा नसून त्रिवेणी आहे, व तिचें जोशीबुवांवर प्रेम जडलें आहे, असें जर यांना कळलें, तर यांना अतोनात वाईट वाटेल ! कारण, आपल्या बहिणीचें प्रेम एका खुनी माणसावर बसलें आहे, ही गोष्ट कोणत्याहि प्रेमळ भावास अनिष्टच वाटणार. ह्मणून त्या गोष्टी खटल्याचा निकाल होईपर्यंत यांना कळवून उपयोग नाहीं ! ताइताच्या मुलीचा पत्ता [illegible] दिला. आणि जोशीबवांचें मन अजून प्रेमासंबंधानें कोरेंच

गहे, तोंपर्यंत आपल्या कामगिरी-

घाई केली पाहिजे. ( उघड )

च्या मुलीचा पत्ता लागला ना ?

रशास्त्र्यांच्या घरांत असेल, असा

द्दल मला खात्री देऊन त्या घरीं

तों.

ा—जोशीबुवांचें मनहि अजून प्रेमापासून अलिप्तच आहे ना?

त्र—नाहीं असें ह्मणायला मला अजून कारण सांपडलें नाहीं.

ा—मग माझें बक्षीस देतां ना?

त्र—मीं मागील खेपेला बक्षिसाची गोष्ट काढली होती, तेव्हां ाचा फणकारा आला होता, हें तुझ्या लक्षांत आहे ना?

ा—आला असेल. पण ह्मणून मीं बक्षिसावरचा आपला हक्क , असें मात्र होत नाहीं! तुह्मी कोणतें बक्षीस देणार होतां बरें?

व—नेहमीं तुझ्या अर्ध्या वचनांत राहील असा प्रेमळ पति द्यायचा!

ना—मी तर मनानें आधींच एकाला वरून चुकलें आहें. ा तुह्मीं पसंत केलेला पति जर श्रेष्ठ ठरला, तर माझी निवड रद्द याचा स्वीकार करण्याला मी तयार आहें. पण तें एका अटीवर हो!

ंव—ती कोणती?

ना—तुह्मी जशी माझ्या पतीची निवड करणार, तशी मींहि पत्नीची निवड करणार.

ंव—मीसुद्धां आपल्या पत्नीची निवड करून चुकलों आहें. तिच्यापेक्षां तुझ्या पसंतीची स्त्री जर श्रेष्ठ असेल, तर मी तुझेंच ण करून माझी स्वतःची निवड रद्द करावयाला व ती स्त्री ायला तयार आहें.

ुना—ठरलें?

गंव—ठरलें.

ुना—पण आतां दोन वधूंची आणि दोन वरांची तुलना कशी कुठें करायची?

गंव—इथेंच करूं. मी आपल्या निवडीची स्त्री आणि तुझ्याकरितां केलेला पति येथें आणितों; आणि तूंहि स्वतःच्या निवडीचा आणि मजकरितां पसंत केलेली वधू कोणत्या तरी निमित्तानें ाऊन ये. ह्मणजे मग तुलना करण्याला काय उशीर?

**यमुना**—पण तुह्माला ती जोडी आणायला उशीर लागणार नाहीं का?

**भार्गव**—मुळींच नाहीं. त्यांचीं घरें अगदीं जवळ आहेत. तुला आपली जोडी घेऊन यायला उशीर लागेल असें दिसतें.

**यमुना**—अंहं ! त्यांचींहि घरें कांहीं लांब नाहींत ! पांचदहा पळांचीच कथा काय ती !

**भार्गव**—मलाहि त्यापेक्षां अधिक अवधि नको.

**यमुना**—मग जा तर तुह्मी. मलाहि त्यांजकडे नोकरांना धाडावें लागेल. ( भार्गव जातो. स्वतःशीं ) मीं आपल्या सौंदर्याच्या अभिमानानें त्यांच्यापाशीं आपलें प्रेम प्रगट केलें नाहीं, त्याचें मला चांगलेंच प्रायश्चित्त मिळालें ! ते कधीं रात्रीं बेरात्रीं बाहेर जात, त्यामुळें तरी मला संशय यावा ? पण बायकांचें मन भोळें हेंच खरें ! नाहीं तर मला अशी भुरळ पडली नसती. कोणा मेल्या कौटाळणीनें त्यांना मोहिनी घातली आहे कुणाला ठाऊक ! त्यांना वाटलें, कीं मीसुद्धां त्यांच्याप्रमाणें हुरळून जाऊन आपलें मन बदलीन ह्मणून ! पण त्यांना माझा हट्टी स्वभाव अजून पुरता उमगला नाहीं ! ( भार्गव एक आरसा घेऊन प्रवेश करतो. )

**भार्गव**—यमुने, तूं अशी मुखस्तंभासारखी मुकाट्यानें उभी कां ? तुझी जोडी कुठें आहे ?

**यमुना**—आपली जोडी पाहूं द्या, नंतर मीहि दाखवीन.

**भार्गव**—मीं आपली जोडी बरोबरच आणिली आहे.

**यमुना**—आणि दिसत नाहीं कुठें ती ?

**भार्गव**—मनुष्य प्रेमांध आणि क्रोधांध झाल्यावर त्याला कांहीं तरी दिसतें का, यमुने ?

**यमुना**—ही थट्टा पुरे करा ! आपली प्रियकरीण दाखवा मला अगोदर ! त्या अवदसेचे नखांनीं डोळे फोडून तिची कशी दशा करतें पहा !

**भार्गव**—अवदशेची दशा केलीस, तर त्यांत तिचें नुकसान तें काय होणार ?



भार्गव---तुला धैर्य होत असेल, तर फोडच माझ्या प्रियकरणीचे डोळे ! ही पहा माझी प्रियकरीण ! [पृष्ठ ११३.]

Manoranjan Press,
Girgaon–Bombay.

Photographers,
Gurudas & Co., Bombay.

**यमुना**—तिला जन्माची अंधळी करून टाकतें.

**भार्गव**—तिला अंधळी केलीस, कीं मग ती तुला मुळींच दिसणार नाहीं !

**यमुना**—ती अंधळी झाली ह्मणून मी थोडीच अंधळी होतें आहें !

**भार्गव**—दुसऱ्यास अपकार केला ह्मणजे तो आपणा स्वतःसच केल्यासारखा होतो, हें तत्त्व तुला पडताळून पहावयाचें असेल, तर माझ्या प्रियकरणीला खुशाल अंधळी कर ! माझी ना नाहीं.

**यमुना**—मला हें तत्त्वज्ञान नको ऐकायला !

**भार्गव**—बरें तर, तुला धैर्य होत असेल, तर फोडच माझ्या प्रियकरणीचे डोळे ! ही पहा माझी प्रियकरीण ! (यमुनेपुढें आरसा धरतो.)

**यमुना**—काय ? मजवरच आपलें प्रेम ?

**भार्गव**—तुला एकदां पाहिल्यावर मीं दुसरीवर प्रेम करणें शक्य आहे का, यमुने ?

**यमुना**—आणि माझ्याकरितां पसंत केलेला पति ह्मणजे आपण स्वतःचना ?

**भार्गव**—दुसरा कोण असणार ? पण यमुने, मीं जशी आपली जोडी तुला सांगितली, तशी तूं नाहीं मला अजून सांगितलीस ? तुझ्या आतांपर्यंतच्या वर्तनावरून ती कोण असेल याचा तर्क मला झालाच आहे. पण तुझ्या तोंडानें तो तर्क खरा करून घेण्याची माझी फार इच्छा आहे.

**यमुना**—आपण पुरुषासारखे पुरुष असून आपल्या रमणीच्या नांवाचा उच्चार केला नाहीं, आणि मी लज्जाशील स्त्रीजातीची असून आपल्या वल्लभाच्या नांवाचा उच्चार करूं ह्मणतां ? ज्या आरशानें आपली रमणी दाखविली, तोच माझा वल्लभहि दाखवील. कारण त्याच्या उदरांत सारें त्रिभुवन कोंदलें आहे. (भार्गवाच्या हातून आरसा घेते व त्याच्यासमोर धरते.) पाहिलात का माझा वल्लभ ?

**भार्गव**—पण यमुने, माझी रमणी आणि तुझा वल्लभ जवळ जवळ उभीं राहिलेलीं अशीं या आरशांत दिसणार नाहींत का ? पाहूं तर खरें

प्रयत्न करून. ( तिला जवळ घेऊन आरसा समोर धरतो. ) अहाहा ! असा योग कधीं तरी येईल, असें मला स्वप्नहि पडलें नव्हतें.

**यमुना**—पण आपण पहात आहोंत, हें तर स्वप्न नाहीं ना ?

**भार्गव**—तुझ्या अधराला दंश करितों, ह्मणजे कळेल हें स्वप्न कीं जागेपण तें !

**यमुना**—(एकीकडे) तसें झालें तर तें मला स्वप्नांतलेंहि स्वप्न वाटेल ! ( उघड ) महाराज, आपल्या निश्चल प्रेमाचें प्रतिबिंब या भंगुर आरशांत नको पहायला. करा तो दूर !

**भार्गव**—खरें ह्मणशील तर आपलें सौंदर्य व तेज पहावयाला सर्वांत उत्कृष्ट आरसा ह्मणजे आपला प्रियजनच होय ! त्याच्या मुखावर आपणाविषयीं उत्कट प्रेम दिसलें, ह्मणजे या सौंदर्याची आणि तेजाची दुसरी कसोटी पहावयालाच नको. प्रिये, चल, तुझ्या वृद्ध मातेला ही गोष्ट कळवून तिचा आशीर्वाद घेऊं. पण ही गोष्ट कळल्यावर तिची निराशा तर नाहींना होणार ?

**यमुना**—त्याची भीतिच नको. माझें सुख तेंच तिचें.

[ जातात.

---

## प्रवेश दुसरा.

[ प्रयागपंडित व त्रिवेणी. ]

**प्रयाग०**—मुली, ऊठ,ऊठ; आणि तुझें काय ह्मणणें आहे, तें मला नीटपणें सांग.

**त्रिवेणी**—महाराज! आपण दयेचे सागर आहांत; तेव्हां मी जी याचना करणार आहें, ती पुरी करणें आपणाला मुळींच जड जाणार नाहीं.

**प्रयाग०**—तुझी याचना काय आहे तीच जर मला अजून कळली नाहीं, तर मी उत्तर तरी काय देऊं ?

**त्रिवेणी**—आपण एकदां मला आश्वासन दिलें, ह्मणजे मी आपली सारी कर्मकहाणी आपणास सांगेन.

**प्रयाग०**—मुली, माझ्यासारख्यावर न्याय करण्याची मोठी जबाबदारी असल्यामुळें मला कोणतेंहि आश्वासन घाईनें देतां येत नाहीं.

**त्रिवेणी**—प्राक्तन माझें! आपण तरी त्याला काय करणार ?

**प्रयाग०**—मुली, तुझें सारें बोलणें ऐकून मी आपलें मानस तुला कळवीपर्यंत तुला असें हताश होण्याचेंहि कारण नाहीं.

**त्रिवेणी**—ऐका तर;हल्लीं एक निरपराधी पुरुष एका भयंकर गुन्ह्याच्या-आरोपावरून अटकेंत पडला आहे.

**प्रयाग०**—निरपराधी असेल तर तुला भिण्याचें कारण नाहीं. तो खात्रीनें सुटेल.

**त्रिवेणी**—पण त्याच्या विरुद्ध फार बळकट पुरावा आहे.

**प्रयाग०**—मग मात्र कठिण आहे. कारण आमच्यासमोर जो पुरावा येतो, त्यावरूनच आह्मांला निर्णय करावा लागतो. तो निर्णय सत्यास कितपत धरून आहे, हें कळणें आह्मांला शक्य नसतें. तें फिर्यादी व आरोपी यांसच काय तें माहीत, किंवा एका परमेश्वरास तरी माहीत!

**त्रिवेणी**—मग आजपर्यंत बरींच निरपराधी मनुष्यें आपल्याकडून दोषी ठरून फांसावर चढलीं असतील ?

**प्रयाग०**—असतील! पण त्याला आमचा निरुपाय असतो. आपणा-विरुद्ध कोणास तिळमात्र संशय घेण्यास जागा सांपडूं नये, अशा तऱ्हेचें वर्तन ठेवणें प्रत्येक मनुष्याचें कर्तव्य असतें. त्या कर्तव्यांत तो चुकला, आणि त्यामुळें तो दोषी ठरला, तर त्याचा दोष इतरांकडे येणार नाहीं.

**त्रिवेणी**—कधीं कधीं काडीचाहि अपराध नसतां केवळ यदृच्छेनें एखाद्याच्या विरुद्ध काहूर जमून येतें; अशा प्रसंगींहि आपण त्याला दोषी ठरवीतच असाल, नाहीं ?

प्रयाग०—असें फारच क्वचित् घडून येत असेल.

त्रिवेणी—घडून येत असलें तरी आपणास कुठून कळणार ?

प्रयाग०—तूं ह्मणतेस तें खरें आहे.

त्रिवेणी—मग असा जर एखादा निर्दोषी मनुष्य आपल्या गैर-समजुतीमुळें फांसावर चढला, तर आपल्या माथीं कांहींच पाप येत नाहीं का ? त्याचीं बायकामुलें उघडीं पडतात, आणि अन्नान्नदशेला येऊन पोहोंचतात; तो जिवंत असतां निढळाच्या घामानें जी मिठभाकरी त्यांना मिळवून देत होता, तीहि त्यांना मिळेनाशी होते; अपराध्याचें कुटुंब ह्मणून जो तो त्यांना दूर लोटतो; आणि या रीतीनें एक जीव मेल्यामुळें अनेक जीवांना तडफडत मरावें लागतें. याचेंहि पातक आपल्या शिरावर नसेलच ?

प्रयाग०—मुली, तूं उभें केलेलें चित्र अत्यंत हृदयद्रावक आहे खरें ! पण त्याची जबाबदारी न्यायाधीशावर येते, असें मला वाटत नाहीं. मनुष्याच्या हातून नकळत जर एखादें दुष्कृत्य घडलें, तर तें कायद्याच्याहि दृष्टीनें पाप नसतें, आणि ईश्वराच्याहि दृष्टीनें नसतें. बुद्धिपुरःसर जर झालें, तर मात्र तें पाप ठरतें.

त्रिवेणी—हा खासा न्याय आहे ह्मणायचा ! ज्याच्या हातून नकळत कां होईना, मनुष्यवध किंबहुना कुटुंबवध होतो, त्यानें उंच हवेल्यांत राहून व उंची वस्त्रेंप्रावरणें वापरीत ह्मातारपणापर्यंत तसेच वध करीत दिवस काढावे, आणि ज्यानें मुंगीलाहि कधीं दुखविलें नाहीं, त्यानें आपल्या निरपराधी कुटुंबासह अकालीं मृत्युमुखीं पडून गिधाडांच्या भक्ष्यस्थानीं पडावें ! महाराज, हा मनुष्याचा न्याय असेल, पण ईश्वराच्या घरचा असा अंधळा न्याय असूं शकणार नाहीं. जो न्यायाधीश कोत्या दृष्टीच्या जगाला अपरंपार बाह्य सुखांत लोळतांना दिसतो, तो आपल्या अन्यायाबद्दल अंतर्यामीं दुःखाग्नींत होरपळत असतो. त्यानें अपराधी ठरविलेला निरपराधी मनुष्य फांसाच्या एका झटक्या-

सरसा जगाच्या यातनांतून मोकळा होतो, परंतु जगानें निरपराधी ठरविलेला हा अपराधी पुरुष आपल्या दुःखाचें ओझें अखेरपर्यंत वाहून खितपत खितपत प्राण सोडतो. त्याचें दुःखविरहित मरणहि जीवनाप्रमाणें असतें, आणि याचें दुःखपूर्ण जीवनहि मरणासारखें असतें. त्याचीं बायकामुलें मनुष्याच्या उपेक्षेनें अकालीं मृत्युमुखीं पडतात, आणि याचीं बायकामुलें दैवी क्षोभानें नाहींशीं होतात.

**प्रयाग०**—मुली, पुरे कर. तूं आपल्या तीव्र शब्दांनीं माझें काळीज कापीत आहेस! बोल, तूं माझ्या गत चरित्रावर हा प्रहार केलास का?

**त्रिवेणी**—तसा प्रहार करण्याइतकें मला त्या चरित्राचें ज्ञान कुठें आहे? माझें लक्ष तूर्त स्वतःच्याच चालू आणि पुढील संकटांकडे आहे.

**प्रयाग०**—अजून तूं आपलें संकट सांगितलें नाहींस. ज्या निरपराधी मनुष्याबद्दल तूं बोललीस, त्याच्यावर कोणत्या गुन्ह्याचा आरोप आहे?

**त्रिवेणी**—खुनाचा.

**प्रयाग०**—मुली, मला तुझी मनापासून दया येते. खुनाच्या खटल्यासारखें गंभीर स्वरूप कोणत्याहि खटल्याचें नसतें. निकाल आरोपीतर्फे झाल्यास स्वतंत्रता, आणि विरुद्ध झाल्यास तात्कालिक मरण, असे त्या खटल्याचे दोन अत्यंत विरुद्ध मार्ग अपराध्याला असतात.

**त्रिवेणी**—आणि ह्मणून न्यायाधीशावर जबाबदारीहि मोठीच असते.

**प्रयाग०**—पण त्याजवर जबाबदारी कितीहि असली, तरी अनुकूल पुराव्याच्या अभावीं अनुकूल निकाल देणें मात्र त्याच्या हातीं नसतें.

**त्रिवेणी**—तर न्यायाधीश ह्मणजे निर्बुद्ध अशीं तोलण्याचीं यंत्रेंच ह्मणावयाचीं! ज्या पारड्यांत जास्त वजन तिकडे झुकावयाचीं. मग अशा चालत्याबोलत्या यंत्राची मी विनवणी करावयाला आलें, हा माझा मूर्खपणाच ह्मणावयाचा! महाराज, आपला फार वेळ घेतला मीं; जातें आतां, क्षमा असावी.

**प्रयाग०**—मुली, तुझें सरळ आणि निष्कपटपणाचें बोलणें माझा हृदयदुर्ग काबीज करीत चाललें आहे!

**त्रिवेणी**—पण मी सरळ आणि निष्कपट आहें, असा पुरावा कुठें सांपडला आपणाला, महाराज?

**प्रयाग०**—तुझा चेहरा हा एक विश्वसनीय लेखी पुरावाच आहे! दुसरा पुरावा कशाला पाहिजे?

**त्रिवेणी**—मी ज्या निरपराधी तरुणाबद्दल आपणापाशीं रदबदली करण्याला आलें आहे, त्याचा चेहरा मजपेक्षांहि निष्कपट आहे. तो पहातांच अत्यंत संशयी मनुष्याचीहि त्याच्या निर्दोषत्वाबद्दल खात्री होईल. शिवाय त्याचें वर्तन किती मायाळूपणाचें आणि उदारपणाचें आहे!

**प्रयाग०**—मुली, तो तरुण तुझा वल्लभ असावासा वाटतो. (त्रिवेणी खालीं पहाते.) तुझ्या मुखानें जरी ती गोष्ट कबूल केली नाहीं, तरी ती त्या मुखावर स्पष्ट दिसत आहे!

**त्रिवेणी**—मी कशाला आतां चोरून ठेवूं? ते माझे जीवितेश्वर आहेत खरे. माझ्यासारख्या अनाथ मुलीचा ज्यांनीं परामर्श घेतला, ते आपल्या राजाचा कसा हो घात करतील? तुह्मीच सांगा—

**प्रयाग०**—काय ह्मणतेस? राजाचा वध केल्याचा आरोप ज्याच्यावर आहे, तोच का हा ज्योतिषी?

**त्रिवेणी**—होय तेच.

**प्रयाग०**—तर मग मुली, मला तुझी अत्यंत दया येते.

**त्रिवेणी**—महाराज, आपण माझी दया येत असल्याबद्दल जों जों बोलतां, तों तों आपणाकडून अपराध्याला दया मिळणार नाहीं, असें स्पष्ट ध्वनित होतें. मला पाहिजे तर कडक शासन करा, पण त्यांना वांचवा. तुमच्या हातून निरपराध्याला शासन व्हावयाचेंच असेल, तर मला शासन करा. निर्दोषीपणांत ते आणि मी सारखींच आहोंत.

**प्रयाग०**—तुझ्या प्रियकरावर केवढा भयंकर आरोप आहे, याची तुला कल्पना नाहीं. खून सामान्य माणसाचा असता, तर अपराध्याला



प्रयाग०—मुली, तुझें काकुळतीचें भाषण माझ्या हृदयाला घरे पाडीत आहे. [ पृष्ठ ११९. ]

[ पृष्ठ ११९. ]

Manoranjan Press,
Girgaon-Bombay.

Photographers,
Gurudas & Co., Bombay.

एखाद्या सबबीवर फांशीची शिक्षा न देतां जन्मठेपेची देतां आली असती; पण राजा ह्मणजे प्रजेचा पिता! त्याचा वध करणारा खुद्द माझा जन्मदाता असता, तरीहि त्याला मरणाची शिक्षा सुनावणें माझें कर्तव्य होतें.

त्रिवेणी—तुह्माला स्वत:ची एकादी मुलगी असेल. तिच्या पतीवर असें संकट आलें असतें, तर तुह्मीं काय केलें असतें, याचा विचार करा. तिला वैधव्याची शिक्षा देण्याला तुमची जीभ खास धजली नसती! तुह्माला मुलगी नसेल, तर घटकाभर मीच तुमची मुलगी आहे अशी कल्पना करा, आणि मला चुडेदान द्या.

प्रयाग०—मुली, तुझें काकुळतीचें भाषण माझ्या हृदयाला घरे पाडीत आहे. न्यायाधीशांना अंतर्यामीं ज्या यातना होत असतात असें तूं ह्मटलेंस, त्या सर्व माझ्या पोटांत कालवाकालव करीत आहेत. तुझ्या चेहऱ्यावरून, तुझ्या आवाजावरून, तुझ्या ढबीवरून मला फार वर्षांपूर्वींच्या माझ्या एका प्रियकर माणसाची आठवण होत आहे. माझ्या संसाराची अधिष्ठात्री देवता, माझ्या हृदयाची स्वामिनी, अठरा वर्षांनीं फिरून समोर उभी राहिली आहे, असा मला भास होत आहे. तूं माझ्या वार्धक्यावर आपलें दर्शनामृत सिंचून मला अठरा वर्षांनीं तरुण करावें, इतकी हुषारी या घटकेस मला वाटूं लागली आहे.

त्रिवेणी—(एकीकडे) यांच्या स्त्रैणपणाबद्दल ज्या कंड्या लोकांत पसरल्या आहेत, त्या खऱ्याच असल्या पाहिजेत.

प्रयाग०—या तुझ्या उपकाराबद्दल मी तुला इतकेंच आश्वासन देतों, कीं तुझ्या वल्लभाचा मजकडून शक्य तितका अनुकूलच विचार होईल. प्रथम मला महाराजांच्या वधाबद्दलच शंका होती; पण राणीसाहेबां-कडून जें पत्र आलें, त्यांत ते दोन दिवसांपूर्वीं एकाएकीं नाहींसे झाल्या-बद्दल मजकूर आहे. याप्रमाणें त्यांचें तिकडे अकस्मात् नाहींसें होणें, व इकडे त्यांचीं वस्त्रें व अलंकार आरोपीच्या पेटींत सांपडणें, या दोन गोष्टींची सांगड घातली, ह्मणजे कोणाहि मनुष्याला आरोपीवरचा आरोप

खरा वाटेल. तथापि तो निर्दोष आहे, अशाच भावनेनें मी त्याच्याविरुद्ध येणाऱ्या पुराव्याकडे पहाण्याचें तुला वचन देतों. इतक्याहि उपर मला माझ्या इच्छेविरुद्ध त्याला शिक्षा द्यावी लागली, तर मुली, माझी अशी इच्छा आणि विनंति आहे, कीं आपल्या वल्लभाचें चिंतन करीत व हें घर आपलेंच आहे असें समजून तूं माझ्या इथेंच रहावेंस.

**त्रिवेणी**—माझ्या वल्लभाच्या मारेकऱ्याच्या घरीं मीं आनंदानें राहूं ह्मणतां? महाराज, मी मोठ्या आशेनें येथें आलें, पण माझी पुरी निराशा झाली. आपला हेतु मी पूर्णपणें ओळखून चुकलें. त्या हेतूवरून माझ्या वल्लभाची आपल्या हातून सुटका होईल, असें मला वाटत नाहीं. जातें मी.

[ जाते.

**प्रयाग०**—( स्वतःशीं ) हिच्या अखेरच्या बोलण्याचा अर्थच मला कळत नाहीं ! कोतवालानें मजबद्दल जी लोकवार्ता पसरल्याबद्दल मला सांगितलें होतें, ती हिच्यापर्यंतसुद्धां जाऊन पोहोंचली कीं काय ? काय असेल तें असो; पण गेलीं अठरा वर्षें माझ्या संसाराचें आकाश नुसत्या काळ्याकुट्ट मेघांनीं व्यापून गेलें होतें, त्यांत आजच प्रथमतः वीज चमकली खरी !

[ जातो.

---

## प्रवेश तिसरा.

[ श्रीपति पहारा करीत आहे. म्हाळसा व भार्गव प्रवेश करितात. ]

**म्हाळसा**—माज्या पतिराजाचा ह्योच का ह्याल? अंदर ग्येल्तं, कीं भाईर निगन्याची ग्वाष्ट ब्वालायाच नग !

**भार्गव**—मीं आज दुपारीं त्यांची व तुझी भेट करविण्याचें ठरविलें, तेव्हां ते तुरुंगांत असतील अशी मला कल्पनाच नव्हती !

**म्हाळसा**—ह्यो का कैदखाना हाय ? आन् माज यजमान हत आल्याती? मंग इक्ती घाई कशापायी क्येलीत? काल व्हत मोकाट, आज

आल्याती कैदखान्यांत, आन् उद्यां चडत्याल फांसावर! मंग त्येंच्याशीं लगान करन्याची कशापायीं घाई करायी?

**भार्गव**—ताई, असें अभद्र बोलूं नये. मी आतां ज्यांच्यासमोर तुला घेऊन जाणार आहें, त्यांच्यापुढें एक अवाक्षरहि काढतां उपयोगीं नाहीं. नाहीं तर सगळाच घाट फसेल. हा पहारेकरी तुझ्या ओळखीचा श्रीपतिच आहे. हा आंत जायला मनाई नाहींच करणार!

**श्रीपति**—अंदर मत् जाव!

**म्हाळसा**—तूं कोनर मज्जाव करनार आमास्नी?

**श्रीपति**—आन् तूं तवा कसं करीत व्हतीस मला? आतां गवासलीस आमच्या तावडीमंदी! आमंदी कशी जातिया पगतों त सई!

**म्हाळसा**—तूं माजा न्हवस का? मंग असं का करतुयास येड्यावानी?

**श्रीपति**—मी तुजा हाय, पन कोन? भाऊ ह्मनशील तर मंग मी न्हाई सोडायचा! दादला ह्मनशील तर मंग—

**म्हाळसा**—तुला दादला ह्मनू? आन् माजा त दादला आमंदी हाय! बायकास्नी दो दो दादल असत्याती व्हय?

**श्रीपति**—ये हाय काय लिचांड? त्यो जोशीबुवा तुजा दादला व्हय? मंग जा आमंदी. मंग न्हाई माजी ना. आन् जवा त्यो फांसावर चडल, तवा तूबी चड!

**भार्गव**—थांब जरा. मी हें पत्र देतों तें त्याला प्रथम दे, आणि तो आंत येऊं द्या ह्मणून ह्मणाला, ह्मणजे आह्मी येतों.

**श्रीपति**—बरं हाय, द्या त्ये पतार. (एकीकडे) ह्ये लई ब्यास जालं! आतां ह्ये पतार जोशीबुवास्नी दुरूनच दावावं, आन् मंग द्यावं बाला न्येउनशान त्यानं सांगितल्यापरमानं! (भार्गव त्याला पत्र देतो. श्रीपति पडद्यांत जातो.)

**भार्गव**—ताई, हा कैदी फार उंच दर्जाचा माणूस आहे. उद्यां हा कैदेंतून सुटला, ह्मणजे माझ्या ह्मणण्याचा खरेपणा तुला कळून येईल.

म्हाळसा—आन् न्हाई सुटला, तरीबी अक्षी उच फांसावरनं लट-कलच !

भार्गव—(एकीकडे) काय करावें? ही ऐन वेळीं घाण करणार खास !

श्रीपति ( येऊन )—आपनास्नी जोशीबुवा बोलावल्याती.

[ सर्व जातात.

---

## प्रवेश चवथा.

धुरंधर—( स्वतःशीं ) भार्गवाच्या पत्रानें मी मोठ्या अडचणींत पडलों आहें. कांहीं होवो, मीं त्रिवेणीला दिलेलें वचन मजकडून कल्पांतींहि फिरणार नाहीं. अरे, पण ही तर म्हाळसा—

[ भार्गव आणि म्हाळसा प्रवेश करितात. ]

म्हाळसा—ह्यो त्यो जोशीबुवा दिसतुया. ह्यो काय ख्योळ ह्याय येव जान !

भार्गव—महाराज, एका शब्दानें आपली सुटका होण्यासारखी असतां या कारागृहाची इतकी हौस कां ?

धुरंधर—यांत माझा एक गूढ हेतु आहे; तो सिद्धीला गेल्यावर तुला सांगेन. तूर्त तूं ज्या कामाकारितां आला आहेस, त्याबद्दलच बोल.

भार्गव—बरें तर मग. आधीं मला आपणास एक प्रश्न विचारला पाहिजे. अनुलोम विवाहासंबंधानें आपलें काय मत आहे ? आपणासारख्या सुधारलेल्या पुरुषास हा प्रश्न विचारणें म्हणजे एका अर्थी आपला अपमानच करण्यासारखें आहे. पण ही गोष्ट संदिग्ध रहाण्यापेक्षां तिचा स्पष्ट खुलासा झालेला बरा.

धुरंधर—भार्गवा, माझ्या मताबद्दलचें तुझें अनुमान मुळींच चुकलेलें नाहीं. वधू प्रत्येक गोष्टींत अनुरूप असली, तर ती हलक्या जातीची आहे येवढ्यामुळेंच तिच्याशीं विवाह करण्याला हरकत येऊं नये.

**भार्गव**—मला आपणाबद्दल मोठा अभिमान वाटतो. आपण आपल्या मताप्रमाणें व्यवहारांत वागण्यासहि चुकणार नाहीं, अशी माझी खात्री आहे.

**धुरंधर**—भार्गवा, आपले विचार आचरणांत उतरविणें हें सरळ मनुष्याचें कर्तव्यच आहे. माझा विचार एका शूद्रकन्येशीं विवाह करण्याचा ठरलाहि आहे.

**भार्गव**—वहावा! मीं ताईला येथें आणण्यापूर्वींच त्याचें आपणाला स्वप्न पडून आपला निश्चयहि तिच्याशीं विवाह करण्याला अनुकूल असाच व्हावा, ही दैवाची कृपा समजली पाहिजे.

**धुरंधर**—हिच्याशीं विवाह करण्याला माझी संमति आहे, असें मीं ह्मटलें नाहीं.

**भार्गव**—आतांपर्यंत ह्मटलें नाहीं खरें, पण त्यांत बिघडलें कुठें? आतां सांगा, आपली संमति आहे कीं नाहीं तें.

**धुरंधर**—अरे, हिची माझी विशेष ओळख नाहीं, किंवा हिचे गुणावगुणहि मला फारसे माहित नाहींत, मग मी काय सांगणार?

**भार्गव**—आपल्या वाडवडिलांना तरी विवाह करण्यापूर्वीं स्वतःच्या वधूंची कुठें माहिती असे? पण ह्मणून त्यांना वैवाहिक सुख कमी होत असे, असें थोडेंच आहे!

**धुरंधर**—सदृश गुण न पहातां विवाह करण्यापुरतें मात्र वाडवडिलांचें अनुकरण करायचें, आणि अनुलोम विवाहाची बाब आली ह्मणजे त्यांचें मत झुगारून द्यायचें, हा कोणत्या मुलखाचा सुसंगतपणा?

**भार्गव**—महाराज, लग्न ह्मणजे एका तऱ्हेची सोडत आहे. जुगारांत अनिश्चितपणा नसला तर जशी मजा येत नाहीं, तशी वधूवरांचें परस्परांविषयीं अज्ञान असल्याखेरीज त्यांची प्रीतिहि जडत नाहीं. खरें ह्मटलें तर अपरिचय हाच बहुधा प्रीतीच्या मुळाशीं असतो.

**धुरंधर**—मला हिचे जे गुण माहीत आहेत, ते माझ्या स्वतःच्या गुणांशीं पूर्णपणें विसदृश आहेत. हें ठाऊक असतां मीं हिच्याशीं लग्न करायला कबूल व्हावें, असें तुझें ह्मणणें?

भार्गव—अपरिचयाप्रमाणें विरोधहि प्रीतीला कारण होत असतो. ज्याप्रमाणें विरुद्ध धर्मांच्या विद्युल्लतांच्या समागमापासून उज्ज्वल प्रकाश उत्पन्न होतो, दिवस आणि रात्र किंवा पृथ्वी व आकाश यांचा संगम जसा हृदयंगम वाटतो, त्याप्रमाणें स्त्रीपुरुषांचे गुण विधात्यानें भिन्न ठेवल्यामुळेंच त्यांचें एकमेकांवर आकर्षण घडतें.त्यांच्या गुणांत जितकी जितकी भिन्नता, तितकें तितकें त्यांचें एकमेकांवर अधिक प्रेम व्यवहारांत दिसून येतें.

धुरंधर—तुझें ह्मणणें खरें मानिलें तर मदनाचा पुतळा व अष्टवक्रा, साधु व कुलटा, पंडित व मूढा यांचे संगम फारच इष्ट ह्मणावे लागतील! तूं ह्मणतोस त्याप्रमाणें जर खरोखरच विरुद्ध गुणांचें परस्परांवर आकर्षण घडतें, तर वधूवरांची निवड करण्याची यातायात तरी कशाला हवी? तें आकर्षणच आपोआप त्यांचे विवाह घडवून आणील. त्यांनां इतरांच्या मध्यस्थीची काय जरूर?

भार्गव—महाराज,आजपर्यंत आपल्या या सत्त्वशील भूमींत वधूवरांनीं परस्परांची चिकित्सा करण्याची वहिवाट नव्हती. फार काय, पण अनेक वधूवरांच्या लग्नांचे वाङ्निश्चय तीं गर्भस्थ असतांना करण्याची रीतहि कांहीं ज्ञातींत दिसून येते.

धुरंधर—आणि दोन्ही पुत्र किंवा दोन्ही कन्या झाल्यास वाट काय?

भार्गव—मग मात्र आईबापांचा नाइलाज होतो.

धुरंधर—नाइलाज कशाला व्हावयाला पाहिजे? लग्नाच्या बाबतींत कांहींच जर पहावयाचें नाहीं, तर ही गोष्ट तरी कशाला पहावयास पाहिजे? मी ह्मणतों त्याप्रमाणें जर योग घडून आला, तर त्या एकजातीय जोडप्यानें सारा जन्म एकत्र कंठण्यास काय हरकत आहे? अरेरे! अशा रीतीनें गर्भस्थ बालकांचे हातपाय जखडून गेल्यावर त्यांना स्वतंत्रतेचें नांवच नको! गर्भाचें बंधन जन्माबरोबर तुटून जातें, पण विवाहाचें बंधन मात्र मरेपर्यंत सहन करावें लागतें. अशा घाईनें व अविचारानें केलेल्या विवाहांतून सुटण्याला मरणाशिवाय दुसरा मार्गहि

शास्त्रानें ठेविला नाहीं. अशा लोकांत दैववाद, दौर्बल्य, बेहिमतीपणा हीं हाडींमाशीं खिळल्यास नवल काय ?

**भार्गव**—आपल्या ह्मणण्याप्रमाणें पतिपत्नींचें प्रेम गुणसादृश्यावर जरी अवलंबून असलें, तरी कालगतीनें हें सादृश्य अत्यंत विसदृश जोडप्यांतहि उत्पन्न होतें. आपणाला आतां आनंदानें नांदण्याखेरीज मार्गच उरला नाहीं, अशी जाणीव एकदां का पतिपत्नींच्या ठिकाणीं उद्भवली, कीं तीं परस्परांच्या स्वभावांचें सूक्ष्म अवलोकन करून हळूहळू सदृश बनत जातात. आणि या रीतीनें त्यांचें एकमेकांवर प्रेमहि उत्पन्न होतें.

**धुरंधर**—अंधारकोठडींतील कैद्यांचें ज्याप्रमाणें अंधकारावर उत्पन्न होतें त्याप्रमाणेंच—

**भार्गव**—वधूनें लाजून खालीं पहाणें, पतीकडे चोरून पहात गालांतल्यागालांत हंसणें, त्याला तांबूल देणें, या प्रीतिसोपानाच्या पायऱ्याच होत. इतर वृद्धिशील वस्तूंप्रमाणें प्रीतीचीहि जोपासना व मशागत केलीच पाहिजे. नेत्रांचें मीलन झालें, कीं प्रेमाचा संचार होतो, ही कल्पना काव्यांत शोभून जाते, पण ती व्यवहारांत मुळींच उपयोगीं नाहीं.

**धुरंधर**—भार्गवा, अपरिचयानें प्रेम उत्पन्न होतें, याला हा अपवाद वाटतें ?

**भार्गव**—आतांपर्यंतच्या आपल्या वादांत आपण एक गोष्ट गृहीत घेतलेली आहे, कीं लग्नाच्या बाबतींत वधूवरांशिवाय इतरांच्या सुखाकडे पहाण्याची कांहीं जरूर नाहीं. पण हा विचार केवळ स्वार्थदृष्टीचा आहे. आपणांस समाजांत जर वागावयाचें आहे, तर इतरांच्या इच्छेकडे अगदींच दुर्लक्ष करून चालावयाचें नाहीं.

**धुरंधर**—वधूवरांनीं व्याही, विहिणी, करवल्या, वऱ्हाडी, पंक्तिबारगीर, ताशेवाले, वाजंत्री, तमासगीर यांपैकीं प्रत्येकाकडे लक्ष पुरविलें पाहिजे. स्वतःकडेच काय तें पुरवावयाचें नाहीं ! त्यांच्या क्षणिक सुखाकरितां आपल्या कायमच्या सुखावर पाणी सोडलें पाहिजे ! असेंच ना ?

**भार्गव**—महाराज, मीं आपली सेवा आजपर्यंत अत्यंत एकनिष्ठपणें केली—

**धुरंधर**—आजपर्यंत तूं माझ्या सुखाची काळजी वाहिलीस, ह्मणून माझा सारा जन्म दुःखांत लोटण्याचा तूं प्रयत्न करावास कीं काय? तूं आजपर्यंत आपल्या मधुर संगतीनें मला सुख दिलेंस, तें मला जन्मभर दुःखांत पाडण्याकरितां कीं काय? दुष्टांच्या खड्गांपासून माझें रक्षण केलेंस, तेंहि ही प्रखर सुरी माझ्या गळ्यांत कायमची बांधण्याकरितां कीं काय?

**भार्गव**—महाराज, आपण माझा हट्ट पुरविला नाहीं, तर माझें गत जीवित व्यर्थच गेल्यासारखें होईल.

**धुरंधर**—आणि पुरविला तर माझें भावि जीवित फुकट जाईल; त्यानें तुला सुख होईल का? तूं मला असा उपदेश करितोस, पण तुझें स्वतःचें वर्तन त्या उपदेशास धरून आहे का? यमुनेवर तुझें प्रेम जडलें, तें तुझ्या स्नेह्याच्या सांगीवरून जडलें, कीं अगदीं स्वतंत्रपणें जडलें? तुला जशी विवाहाच्या बाबतींत स्वतंत्रता पाहिजे, तशी मला नको का? तुला खरें सांगूं? माझें प्रेम दुसऱ्याच एका तरुणीवर बसून तिच्याशीं विवाह करण्याचें मी तिला वचनहि देऊन चुकलों आहें. तें वचन मला पाळायला हवें. दुसरीचा विचार करणेंहि पाप होईल.

**भार्गव**—हं! हा आरामबागेकडे जाण्याचा परिणाम दिसतो! महाराज, अगदीं नवीन परिचयाच्या मुलीला दिलेलें वचन आपणाला मोडवत नाहीं, आणि बाळपणच्या स्नेह्याचें वचन आपणाला मोडवतें?

**धुरंधर**—( एकीकडे ) आपण एखाद्या गोष्टीची कड उचलली, कीं तिच्यांतील व्यंगेंसुद्धां आपणास दिसेनाशीं होतात! ( उघड ) भार्गवा, मीं जर एखादी अशिक्षित कुणबीण तुझ्यापुढें उभी केली, आणि यमुनेला सोडून तिच्याशीं विवाह करण्याची तुला गळ घातली, तर तूं ऐकशील का?

**भार्गव**—बरें, आपल्या वल्लभेचें नांव तरी मला कळेल का?

**धुरंधर**—तेंसुद्धां मला तूर्त सांगतां येत नाहीं, याची क्षमा कर.

**भार्गव**—आपण या गोष्टीचा पुन्हा एकदां विचार करावा, अशी माझी विनंति आहे. झाळसे, चल जाऊं. महाराजांच्या पसंतीस तूं उतरत नाहींस, हें तुझें दुर्दैव आहे, दुसरें काय ?

**झाळसा**—नसन मी त्येला पसंत तर माजं ख्येटर आल्डया त्येच्या संग लगान कराया ! मी त्या शिरप्यासंगच लगान लावनार !

**भार्गव**—हं, चल, उचल पाऊल लवकर; एक शब्दहि बोलूं नकोस.

**झाळसा**—मला कोनाचं भ्या बोलायला ?

[ जाते.

**धुरंधर**—भार्गवा, याच मुलीला मीं जन्माची सोबतीण करावें, असें तुझें ह्मणणें ?

[ त्रिवेणी प्रवेश करितें व अंगावरील बुरखा काढते. ]

**भार्गव**—( एकीकडे ) अस्सें ! याच मुलीनें महाराजांना वेड लाविलेलें दिसतें. पाहून घेईन !

[ जातो.

**त्रिवेणी**—( स्वतःशीं ) झाळसेच्या वशिल्यानें येथपर्यंत प्रवेश तर करून घेतला !

**धुरंधर**—कोण ? त्रिवेणि ! ( त्रिवेणीस आलिंगन देतो. ) प्रिये, तूं आपला जीव माझ्याकरितां संकटांत कशाला घातलास ?

**त्रिवेणी**—आपण मजकरितां साऱ्या समाजाचा रोष आपणावर ओढून घेण्याला तयार झालांत. मी केवळ अधिकाऱ्यांचा रोष ओढून घेण्याला धजलें, यांत अधिक तें काय केलें ?

**धुरंधर**—ह्मणजे तुझें ह्मणणें तरी काय ?

**त्रिवेणी**—मी हा बुरखा आणिला आहे. हा अंगावर घेऊन आपण बाहेर पडावें. पळाचाहि उशीर कामाचा नाहीं.

**धुरंधर**—आणि तूं माझ्या जागीं बसणार, होय ?

त्रिवेणी—आपण एकदां आपल्या पायरीपर्यंत माझी योग्यता ठर-विल्यावर मला आपल्या जागीं बसण्याला कोणती हरकत असणार? आपल्या वासानें पवित्र झालेलें हें स्थान मला तीर्थासारखें आहे. येथें मी आनंदानें राहीन.

धुरंधर—आणि तुझ्या प्राणांनीं मी आपले प्राण विकत घेऊं ह्मणतेस? त्रिवेणि, इतका नीच अजून मी झालों नाहीं!

त्रिवेणी—मी इथें राहिलें तर माझ्या प्राणांना मुळींच धक्का पोंच-णार नाहीं.

धुरंधर—धक्का प्रत्यक्ष पोंचला नाहीं, तरी परिणाम तोच होणार! ते यमदूत तुझे हालहाल करून मजवरचा सूड तुजवर उगवतील. मृत्यु पुरवला पण या यातना नकोत, असें तुला होऊन जाईल.

त्रिवेणी—पण आपले प्राण तर वांचतील ना? आपण माझे पंचप्राण, जिवाचे कलिजे आणि जिव्हाळ्याचे जिव्हाळे आहांत. आपण सुखरूप असलांत ह्मणजे मीहि सुखरूप असल्यासारखीच आहें. उलट पक्षीं आपल्या जिवाचें कांहीं बरेंवाईट झालें, तर मी जिवंत असूनहि मेल्या-सारखीच आहें!

धुरंधर—(एकीकडे) अहाहा! हिच्या प्रेमाची याहून अधिक कसोटी ती काय पहाणार? (उघड) त्रिवेणि, आतां खरी गोष्ट तुला सांगायला हरकत नाहीं. मीं आतांपर्यंत तुझ्या निर्मल प्रेमाची परीक्षा पहाण्याकरितां हें सारें सोंग केलें होतें, त्याची क्षमा कर. प्रिये, मी ज्योतिषी नाहीं; ज्याचा खून केल्याचा माझ्यावर आरोप आहे, तोच मी धुरंधर! माझ्या केंसालाहि धक्का लावण्याला कोणी धजणार नाहीं. मीं आपलें खरें नांव प्रकट केलें, कीं मीच नुसता बंदींतून सुटेन असें नाहीं, तर राज्यांतील सारे कैदी सोडण्यांत येतील! मीं आपल्या तोंडाचें कुलूप काढण्याचा अवकाश, कीं या तुरुंगाचीं सारीं कुलुपें आपली मगरमिठी सोडून धडाधड

जमिनीवर आदळतील! आणि मी भ्रुकुटिभंग केल्याबरोबर या तुरुंगाच्या भिंतींचाहि भंग होऊन त्या कोसळून पडतील!

**त्रिवेणी**—( एकीकडे ) विपत्तीमुळें यांचें मस्तक फिरलें कीं काय? ( उघड ) महाराज, आपण असें बोलूं लागलांत, कीं माझ्या हृदयाला कसें कांपरें सुटतें! कृपा करा, आणि आपलें मस्तक शांत करा. कोणीं ऐकलें तर आपणाला उन्मादवायुच झाला कीं काय, असें त्याला वाटेल.

**धुरंधर**—मी दुसऱ्या कोणाचीहि पर्वा करीत नाहीं. पण त्रिवेणि, तुलाहि असें वाटतें का?

**त्रिवेणी**—आपली बुद्धि समुद्रासारखी गंभीर, आणि आपलें धैर्य मेरुपर्वताप्रमाणें अचल आहे, हें मला माहीत आहे. त्यांच्यांत एवढ्याशा संकटानें विकार होईल, हें संभवत नाहीं. महाराज, आपण हा विनोद करीत आहांत.

**धुरंधर**—त्रिवेणि, मी राजा आहें, हें तुलासुद्धां जर खरें वाटत नाहीं, तर इतरांना कसें वाटणार?

**त्रिवेणी**—महाराज, आपण राजेच काय, पण राजापेक्षांहि श्रेष्ठ आहांत. राजाची सत्ता काय ती बाह्य सृष्टीवर मात्र चालते; पण आपली माझ्या अंतःसृष्टीवरहि अनियंत्रित सत्ता चालत आहे. परचक्र आलें, कीं राजाचें सिंहासन डळमळूं लागतें. पण आपण ज्या या हृदयसिंहासनावर विराजमान आहांत, तें मेरूप्रमाणें अचल आहे.

**धुरंधर**—मग माझ्या बोलण्यावर तुझा विश्वास कां नसावा?

**त्रिवेणी**—अजूनहि तुह्मी आपलें ह्मणणें सोडीत नाहीं ना?

**धुरंधर**—मी आपलें ह्मणणें सोडून देऊं? लोकांना खरें वाटावें ह्मणून मी खोटेपणाचा अंगीकार करूं? मी तोतया आहें हा लोकांचा समज खरा ठरावा, ह्मणून मी असमंजसपणानें आपल्या हक्काच्या कुळावर व नांवावर पाणी सोडूं? मी निर्दोषी आहें असें ठरल्यास न्यायसभेंतील

तमासगिरांची निराशा होईल ह्मणून मी माझ्या राज्याची आशा सोडून देऊं? मी फांसावर चढतांना पाहून प्रेक्षकांचे डोळे तृप्त व्हावेत, ह्मणून मी आपल्या जन्मसिद्ध हक्काकडे डोळेझांक करूं?

**त्रिवेणी**—महाराज, आपण असें बोलूं लागलांत, कीं आपण तोतये आहांत हा लोकांचा समज दृढ नाहीं का होणार?

**धुरंधर**—पुन्हा लोकांचें नांवहि नको मला ऐकायला! मी लोकांचा शास्ता आहें, लोक माझे शास्ते नाहींत! माझ्या लहरींप्रमाणें त्यांनीं नाचलें पाहिजे; मी त्यांच्या हुकुमाला मान लवविणार नाहीं! त्रिवेणि, माझ्याविरुद्ध आणिलेल्या पुराव्यांतील धागे किती निःसत्त्व आहेत, त्याची इमारत कशा कच्च्या पायावर उभारलेली आहे, हें इतरांपेक्षां तुला माहीत असावें. कारण, विहिरीजवळ रक्त दिसण्याचें व मी आराम-बागेकडे निघून जाण्याचें कारण तुला चांगलें ठाऊक आहे. असें असतांना तुझाहि माझ्या बोलण्यावर विश्वास बसूं नये, हें आश्चर्य नाहीं का?

**त्रिवेणी**—पण कोतवालानें आपणास या गोष्टींचें स्पष्टीकरण करा-वयास सांगितलें, तेव्हां आपण गप्प राहिलांत?

**धुरंधर**—तर काय, त्या रात्रींची इत्थंभूत हकीकत सांगून तुझें रहस्य चव्हाट्यावर आणूं? आणि मजबरोबर तुझीहि मान या हिडिस आरोपांत गोवूं?

**त्रिवेणी**—त्या रात्रीं विहिरीजवळ असल्याबद्दल आपण कबुली दिली नसती, तर इतर पुराव्याला फारसा जोर आला नसता.

**धुरंधर**—संकटाच्या भीतीनें असत्य बोलणें ह्मणजे नामर्दपणा होईल. आजपर्यंत मीं छद्मवेष घेऊन जी वंचना केली, ती भीतीनें केली नसून प्रेमप्राप्तीच्या आशेनें केली. पण त्रिवेणि, खरें ह्मणशील तर मला संकटाची भीति वाटण्याचें कारण कधींहि नव्हतें, आणि हल्लींहि नाहीं.

**त्रिवेणी**—सरकारतर्फेच्या पुराव्याच्या सांखळींतील एक दुवा आप-णास फारच जड जाणार आहे. आणि त्याचीच मला भारी धास्ती वाटते.



**धुरंधर**—पुन्हा लोकांचें नांवहि नको मला ऐकायला ! मी लोकांचा शास्ता आहें, लोक माझे शास्ते नाहींत ! [ पृष्ठ १३०. ]

**धुरंधर**—तो कोणता?

**त्रिवेणी**—आपण या शहरीं आलांत त्याच्यानंतर एका आठवड्यानें धुरंधरमहाराज बंदरांतील आपल्या वाड्यांतून नाहींसे झाले, असें राणीसाहेबांच्या पत्रांत आहे.

**धुरंधर**—मला कोणीं ओळखूं नये, ह्मणून ती मीं आईसाहेबांच्या सूचनेवरून एक युक्ति योजिली होती. पण ती माझ्याच गळ्यांत आली आहे अखेरीस!

**त्रिवेणी**—हा विचार आपणास मागाहून सुचला, असें अधिकाऱ्यांस वाटेल.

**धुरंधर**—अधिकाऱ्यांना कांहीं जरी वाटलें, तरी आईसाहेब मला ओळखल्यावांचून रहाणार नाहींत. तोतयाचें कारस्थान वास्तविक आमचेंच कारस्थान आहे, आणि मी नाहींसा झालों नसून सुरक्षित आहें, या गोष्टी त्यांच्या सांगण्यावरून उघड होतील.

**त्रिवेणी**—बरें, आपण माझें नांव अधिकाऱ्यांना सांगितलें असतें, तर मजवरहि आरोप येणाचा संभव होता, असें आपण मघांशीं ह्मणालांत, तें खरेंच का?

**धुरंधर**—तसा बराच संभव होता, यांत कांहीं संशय नाहीं. खुनासारखें काम एकाच्या हातून होण्यापेक्षां दोघांच्या हातून होणें अधिक संभवनीय आहे. त्या रात्रीनंतर लागलीच माझ्याबरोबर तूंहि आरामबागेकडे गेलीस. शिवाय तुझा माझा स्नेह आहे, ही गोष्टसुद्धां आतां जाहीर झालीच आहे.

**त्रिवेणी**—ठीक आहे तर, मी जातें आतां. आपण हा बुरखा घेऊन बाहेर पडायला नाहींच ना तयार?

**धुरंधर**—तें मीं तुला प्रथमच सांगितलें.

**त्रिवेणी**—आपण जर आपला आग्रह सोडीत नाहीं, तर या खटल्यांत मला एकटीलाच काय कारितां येण्यासारखें आहे, तें मला पाहिलें पाहिजे.

[ जाते.

धुरंधर—( स्वतःशीं ) हिनें जातांना जे उद्गार काढिले, त्यांचा अर्थ काय असावा बरें ? कांहीं जरी असला, तरी तिच्या कृतींत उज्ज्वल प्रेमाचें स्वरूपच भरलेलें दिसून येईल, अशी माझी खात्री आहे. तिनें कोणताहि उपाय योजण्याचें मनांत आणलें असलें, तरी त्याची जरूर पडण्यापूर्वींच बहुधा अटकेंतून माझी सुटका झाल्याचें तिला आढळून येईल.

---

# अंक पांचवा.

## प्रवेश पहिला.

[ यमुना व भार्गव. ]

**भार्गव**—( एकीकडे ) त्या त्रिवेणीनें थोड्या अवकाशांत आमच्या महाराजांचें मन इतकें भारून टाकलें, कीं माझी व त्यांची इतक्या वर्षांची मैत्री, पण माझ्या वचनाचाहि त्यांनीं अव्हेर केला. या चवचाल पोरीचें असें एखादें बिंग मला सांपडणार नाहीं का, कीं त्यानें महाराजांचें मन तिजबद्दल कलुषित व्हावें ? (उघड) यमुने, जोशीबुवांनीं विश्वेश्वरशास्त्र्यांच्या घरच्या कोणत्याहि मुलीला मोह पाडूं नये, अशाविषयीं तूं खबरदारी घेतली होतीस ना ?

**यमुना**—हो, मग काय झालें ?

**भार्गव**—त्या त्रिवेणीनें त्यांना आपला दास करून सोडलें आहे. यावरून तूं त्यांची बरीच उपेक्षा केलेली दिसते.

**यमुना**—हा सारा आरामबागेंतील एकांतवासाचा परिणाम असावा.

**भार्गव**—असेलहि कदाचित्. पण ज्या एका प्रमुख अटीवर तुझा व माझा विवाह होण्याचें ठरलें, ती अट नकळत कां होईना, याप्रमाणें मोडल्यामुळें ती फिरून पार पाडणें आपलें उभयतांचें कर्तव्य आहे.

**यमुना**—एका जोडप्याचा संगम घडण्याला दुसऱ्याचा वियोग होणें आवश्यक थोडेंच आहे !

**भार्गव**—येथें तर तें आवश्यकच आहे. कारण या पोरीच्या कारस्थानामुळें माझा सगळा व्यूह ढांसळण्याच्या बेताला आला आहे.

**यमुना**—( एकीकडे ) अशा खुनी माणसावर त्रिवेणीचें मन बसलें, ही गोष्ट एकंदरींत चांगली झाली नाहीं. तिचा स्वभाव इतका एकनिष्ठ पडला, कीं जोंपर्यंत तो तिच्याशीं एकनिष्ठपणानें वागत आहे, तोंपर्यंत तिचें मन ब्रह्मदेवालासुद्धां बदलतां येणार नाहीं. पण त्यानेंच जर तिचा त्याग केला, तर कदाचित् तें फिरेलहि.

**भार्गव**—कां? विचार कसला करतेस?

**यमुना**—तुमची विघडलेली घडी पुन्हा जमवितां येईल कीं नाहीं, हें पहात होतें.

**भार्गव**—ह्मणजे त्यांची जमलेली घडी पुन्हा बिघडवितां येईल कीं नाहीं, याचाच विचार चालला होताना? मग सांपडते आहे का कांहीं युक्ति?

**यमुना**—त्रिवेणी काल रात्रीं त्या रंगेल न्यायाधीशाकडे गेली होती, असें मला तिजकडूनच कळलें आहे.

**भार्गव**—कशाला गेली होती?

**यमुना**—जोशीबुवांबद्दल त्याच्यापाशीं रदबदली करण्याकारितां.

**भार्गव**—कशाकारितां का गेली असेना! गेली होती, येवढी गोष्ट आपल्या बेताला पुरे आहे.

**यमुना**—पण तिनें सांगितलेल्या गोष्टीचा जर आपण तिच्याच विरुद्ध उपयोग केला, तर तो विश्वासघात नाहीं का होणार?

**भार्गव**—पण त्यानें जर परिणामीं तिचें कल्याण होणार आहे, तर विश्वासघात करण्यासारखा स्वार्थत्याग आपण केलाच पाहिजे.

**यमुना**—( हंसून ) आपलें ह्मणणेंहि खरें आहे. शीलत्याग हा प्राणत्यागापेक्षांसुद्धां मोठा स्वार्थत्याग आहे.

[ जातात.

---

## प्रवेश दुसरा.

[ पार्थिव व त्रिवेणी. ]

**पार्थिव**—त्रिवेणि, त्या ज्योतिष्याला आह्मीं पकडतांना तूं जो आक्रोश केलास, त्यानें माझें मन तुजकडे वेधून गेलें आहे. तुझें हृदय किती तरी एकनिष्ठ! नाहीं तर ती गंगू! जिकडून वारा वाहील, तिकडे पाठ देण्याची तिची नेहमीं तयारी! जोंपर्यंत धुरंधरास राज्य मिळणार अशी तिची खात्री होती, तोंपर्यंत त्याला पहाण्यापूर्वींच तिचें प्रेम त्याजवर जडलें होतें. पण त्या बिचाऱ्याचा असा शोचनीय वध होतांच तें प्रेम त्याजवरचें उडून मजवर बसलें! माझें जर आज कांहीं बरेंवाईट झालें, तर माझ्यामागून जो कोणी राज्याचा वारसा होईल, त्याजवर तें बसल्या-वांचून राहणार नाहीं! तिच्या प्रेमाचा रोपा फोंफावण्यास वैभवाची हवा आणि संपत्तीची ऊब लागते. कारागृहासारख्या अंधेऱ्या आणि झोंपडीसारख्या आकुंचित जागीं त्याची वाढ होण्यास अवकाशच मिळत नाहीं. त्रिवेणि, तुझें प्रेम मात्र अचल आहे. तिचें प्रेम राज्याच्या मागें-मागें घुटमळतें, तर तुझें प्रेम नेहमीं तुझ्या वल्लभालाच चिकटून रहातें. तिला राजा वल्लभ वाटतो, तर तुला वल्लभ राजा वाटतो. तो वल्लभ महालांत असो किंवा खोपटांत असो, सुखांत असो किंवा दुःखांत असो, तुझें प्रेम त्याला एकटें सोडून कधींहि जाणार नाहीं. अखेरीस त्याला फांसावर मरण जरी आलें, तरी तुझें प्रेम तुझ्या आत्म्यासह स्वर्गींसुद्धां त्याची सेवा करण्याला जाईल, यांत मला मुळींच शंका वाटत नाहीं. त्रिवेणि, मला तुझ्या वल्लभाचा मनापासून हेवा वाटतो.

**त्रिवेणी**—पार्थिवराज, आपणाला माझ्या प्रेमाबद्दल जर इतका आदर वाटतो, तर त्या प्रेमाच्या विषयाला वांचविण्याची आपण खटपट नाहीं का करणार ?

**पार्थिव**—त्रिवेणि, तुझ्या वल्लभाचा गुन्हा फार भयंकर आहे. माझ्या प्रिय धुरंधराला अजून जगांतील सुखाचा यत्किंचित्‌हि अनुभव आला

नव्हता. त्यानें सुखाचा पेला आपल्या ओंठाला लावण्यापूर्वींच तुझ्या वल्लभानें तो बलात्कारानें त्याच्या हातून हिसकावून घेण्याचा प्रयत्न करून त्या प्रयत्नांत त्याचा वधहि केला, हा काय लहानसहान अपराध ?

**त्रिवेणी**—ते अपराधी आहेत, हें मला कधींच खरें वाटणार नाहीं.

**पार्थिव**—रमण-रमणी परस्परांच्या सौंदर्यावर भाळून एकदां का परस्परांच्या प्रेमपाशांत गुरफटलीं, म्हणजे त्यांना एकमेकांचें अंतरंगहि त्या सौंदर्याइतकेंच अद्वितीय वाटूं लागतें. त्यांना एकमेकांच्या नयनबाणांनीं चालविलेल्या अचुक शरसंधानाचा प्रत्यक्ष अनुभव असतो. पण नयना-प्रमाणें हातूनहि वधासारखें काम होईल, हें मात्र त्यांना शक्य वाटत नाहीं. त्रिवेणि, वल्लभावरील तुझ्या अचल विश्वासाबद्दल मला अत्यंत आदर वाटतो; पण त्यानें त्याच्या गुन्ह्याबद्दलचें माझें मत मला बदलतां येत नाहीं, याची क्षमा कर.

**त्रिवेणी**— त्यांच्याकडून गुन्हा घडला असें जरी घटकाभर कबूल केलें, तरी त्या गुन्ह्याची सपशेल माफी देण्याचा आपणाला पूर्ण अधिकार आहेच.

**पार्थिव**—या खटल्याचा निकाल होईपर्यंत मला कोणताच अधिकार प्राप्त होणार नाहीं, हें तूं विसरतेस. आतां अधिकार नसला तरी माझें राणीसाहेबांपाशीं तितकें वजन आहे असें तूं म्हणशील; पण तें वजन तरी मी अशा कामीं कसें खर्च करूं ? त्यांना असें सांगूं म्हणतेस, कीं तुमच्या पोटच्या मुलाचा निर्दयपणें खून करणाराचा अपराध तुम्ही पोटांत घाला म्हणून ? त्रिवेणि, माझ्या ओंठांतून निघूं नये, आणि त्यांच्या कानांनीं ऐकूं नये, अशी ही अस्वाभाविक व उरफाटी विनंति मी त्यांना करूं लागलों, तर मीसुद्धां खुनी मनुष्याला सामील आहें, असा नाहीं का त्यांना संशय येणार ? या खुनामुळें सर्वांत अधिक हित माझेंच झालें आहे. तुझ्या वल्लभानें खड्गानें धुरंधराचा देह छिन्नभिन्न करून माझ्याच उन्नतीचा मार्ग सोपा केला आहे. त्यानें धुरंधराचें रक्त शिंपडून माझ्या राज्यारोहणप्रसंगींच्या संमार्जनाची पूर्वतयारीच जणूं

काय केली आहे ! अशा नाजूक प्रसंगीं मला फार सावधगिरीनें वागलें पाहिजे. मी मुकाट्यानें राहिलों, कीं घडलेल्या प्रकाराबद्दल मला दुःख होत नसून उलट आनंदच वाटत आहे, असा लोक तर्क करतील. बरें, शोक करूं लागलों, तर मी कांगाव करीत आहें असें ते अनुमान काढतील. अशा वेळीं मी जर तुझ्या वल्लभातर्फे चकार शब्द काढला, तर त्याचा लोक भलताच विपर्यास करतील.

**त्रिवेणी**—मग आपणाकडून मला कांहींच मदत होण्यासारखी नाहीं तर ?

**पार्थिव**—मी तुला मदत करण्यास सिद्ध आहें, व त्याकरतां आई-साहेबांचा व प्रजेचा संशयहि मजवर ओढून घेण्याला मी तयार आहें. पण हें सारें एकाच अटीवर.

**त्रिवेणी**—आपण वाटेल ती अट घाला. माझा प्राण जरी आपण मागून घेतला, तरी तोहि देण्याला माझी तयारी आहे. पण कसेंहि करून त्यांचे प्राण वांचवा.

**पार्थिव**—तुझ्या प्राणाइतकें मूल्यवान् बक्षीस मला नको आहे. माझी भूक फारच् अल्प आहे. तुझा वल्लभ सुटल्यावर तूं माझी पत्नी व्हायला कबूल झालें पाहिजेस. तुझें अचल प्रेम पाहिल्यापासून मला त्याच्या प्राप्तीचा सारखा ध्यास लागून राहिला आहे.

**त्रिवेणी**—( स्वतःशीं ) जिकडे जावें तिकडे आपस्वार्थीपणा ! (उघड) मीं आपलें प्रेम त्यांच्यावरून काढून आपणाला दिलें, ह्मणजे मग तें अचल कसें राहिलें ? आणि मग त्याची आपल्या दृष्टीनें योग्यता तरी काय उरली ? मघांपासून आपण माझ्या अचल प्रेमाचें इतकें वर्णन केलेंत, तें निरर्थक होतें तर ? माझें शिळें प्रेम मिळाल्यानें आपली भूक तरी कशी निवणार ?

**पार्थिव**—त्रिवेणि, धुरंधराची राज्यलक्ष्मी मिळाल्यापासून मला जितका आनंद झाला आहे, त्याच्या शतपट आनंद तुझें प्रेम तुझ्या वल्लभावरून मजवर बसल्यानें मला होणार आहे. मग तें प्रेम शिळें असलें तरी मला चालेल.

**त्रिवेणी**—शिळ्या प्रेमानेंच जर आपलें समाधान होत असेल, तर गंगूताईचीच आराधना कां नाहीं करीत ?

**पार्थिव**—कारण इतकेंच, कीं गंगूचें प्रेम माझ्या राज्यावरच काय तें बसेल, मजवर बसणें शक्य नाहीं.

**त्रिवेणी**—मग मीहि आपणास सांगतें, कीं माझेंहि प्रेम आपणावर बसणें शक्य नाहीं.

**पार्थिव**—त्रिवेणि, तूं जर माझी अर्धांगी झालीस, तर तुझ्या पायीं माझें सर्वस्व वहाण्याला मी तयार आहें. तुझी क्षणिक लहर पुरविण्याला मी आपल्या अक्षय्य सुखावरहि पाणी सोडीन. तुझ्या कपाळावरील आठी नाहींशी करण्याला मी आठी प्रहर तुझी मनधरणी करीन, आणि तुझें हास्य कायम ठेवण्याला मी तुझा खुषमस्कऱ्या होऊन राहीन.

**त्रिवेणी**—आपलें बोलणें कितीतरी विसंगत आहे! माझें राज्यावर मुळींच प्रेम नाहीं, हें माहीत असतां आपण आपलें राज्य माझ्या पायीं अर्पण करीत आहांत! आणि माझें प्रियकरावरील प्रेम अढळ आहे, हें जाणत असूनहि आपण तें ढळविण्याचा प्रयत्न करीत आहांत!

**पार्थिव**—माझी विनंति जर तूं मान्य करणार नाहींस, तर तुझें अप्रिय करण्याचेंहि माझ्या हातांत किती आहे, याची तुला अजून नीटशी कल्पना झालेली दिसत नाहीं. तुझा वल्लभ तर योग्य वेळीं फांसावर चढेलच; पण त्याच्या पश्चात् तुझेहि भयंकर हाल करण्यांत येतील. फार काय, पण त्यांत तुझा अंतहि होईल, हें खूप लक्षांत असूं दे. मी जितका प्रेमळ आहें, तितकाच खुनशीहि आहें.

**त्रिवेणी**—त्यांच्या पश्चात् माझा लवकरच अंत होईल, हें मला अप्रिय कसें असणार ? यावरून आपणाला प्रेमाचें स्वरूपच कळलें नाहीं, असें दिसतें. आपल्या कोपापासून मला अपकार न होतां उपकारच होणार आहे. आपण अजून आपला स्वतःचा स्वभावहि चांगला ओळखला नाहीं. कारण, आपणास प्रेमळपणाचा गंधहि नाहीं, व आपल्या खुनशीपणामुळें कोणाचें नुकसानहि होणें शक्य नाहीं.



त्रिवेणी—यावरून आपणाला प्रेमाचें स्वरूपच कळलें नाहीं, असें दिसतें.

[ पृष्ठ १३८. ]

Manoranjan Press,
Girgaon-Bombay.

Photographers,
Gurudas & Co., Bombay.

पार्थिव—बरें आहे. पाहूं या कोण खरें ठरतें तें!

[ जातो.

त्रिवेणी—( स्वतःशीं ) मीं एकतर या मेल्याची पत्नी होऊन प्रियकराचा प्राण वांचवावा, नाहींतर प्रियकरावरील प्रेम कायम ठेवून त्यासह प्राणास मुकावें! एकतर प्राण कायम ठेवून पावित्र्यावर पाणी सोडावें, नाहीं तर पावित्र्य कायम ठेवून प्राणांवर पाणी सोडावें! अशा निलाजरेपणाच्या अटी सुचवायला मेल्याचें तोंड तरी कसें वहातें कोणास ठाऊक! एकदां पावित्र्य गेलें, कीं प्राणांची मातब्बरी काय रहाणार? आणि माझ्या प्रियकराला तरी पावित्र्याची किंमत देऊन विकत घेतलेलें लाजिरवाणें जिणें आवडेल का? ज्या जीवितांत यमयातनांपेक्षांहि भयंकर वेदना होतात, तें मरणापेक्षांहि दुःसह! उलट सत्त्वरक्षणाच्या पायीं मरण आलें, तर शुभ्रकीर्तीरूप देह इतरांना मार्गदर्शक होत, निरामय व अविनाशी स्थितींत यावच्चंद्रदिवाकरौ तळपत राहील. सत्त्वरक्षणासाठीं प्रियकराबरोबर फांसावर चढावें लागलें, तर तें विवाहसूत्रानें बद्ध होण्याकारितां बोहल्यावर चढण्यापेक्षांहि मंगलकारक आहे. पण याच्यासारख्या नीच वासनांच्या कीटकास हें कुठून कळावें? विषयसुख हीच ज्याच्या ऐहिक कर्तव्याची परमावधि, स्वसुखार्थ परपीडन हाच ज्याचा पवित्र धर्म, व परमात्म्याशिवाय भिन्न असें स्वतःचें अस्तित्व नाहीं याऐवजीं स्वतःशिवाय दुसरा परमात्मा नाहीं हें ज्याचें तत्त्वज्ञान, अशा पशूला ईश्वराच्या किंवा आत्म्याच्या उच्च कल्पना कोठून असणार? आणि हा पशु आतां या संस्थानाचा अधिपति होऊन प्रजेची नीति सुधारणार! आणि ते पंडितमहाराज प्रजेचा न्याय करणार! ज्या संस्थानाची न्यायनीति अशा पशूंच्या हातीं, तेथें कुलीन आणि अब्रूदार स्त्रियांनीं रहाण्याची मुळींच सोय नाहीं. या कालभुजंगांचें वर्तन व भाषणच विषारी आहे असें नाहीं, तर यांची नजरसुद्धां इतकी विषारी आहे, कीं ती अंगावरून गेली असतां गरलाचा वर्षाव झाल्या-

सारखा वाटतो. याच्या दृष्टीनें संतप्त व अपवित्र झालेलें माझें शरीर पुन्हा माझ्या प्रियकराच्या स्निग्ध दृष्टीचें सिंचन झाल्याशिवाय शांत व पावन होणार नाहीं. महाराज, असले कामांध पशु जितके अधिक माझ्या दृष्टीस पडत आहेत, तितक्या पटीनें माझा आपल्याविषयींचा आदर वाढत आहे. पण आतां त्यांची सुटका कोणत्या मार्गानें करूं? आतां एकच उपाय उरला आहे. पण त्यालाहि कितपत यश येतें देव जाणे! त्यांत यश आलें नाहीं, तर त्यांचें बरेंवाईट झालेलें पहावयाला मी जिवंत रहाणार नाहीं, हा कृतनिश्चय आहे.

[ जाते.

---

## प्रवेश तिसरा.

[ पार्थिव व खंडेराव. ]

**पार्थिव**—तुमचा मुलगा मोठा हुषार दिसतो. त्या भार्गवानें आरोपीला लिहिलेलें पत्र त्यानें आपणापाशीं ठेवून दिलें, ह्मणून त्या जाहिरातीचा आणि या खुनाचा स्पष्ट संबंध दिसून आला.

**खंडेराव**—त्या ल्योकाची कसली घेऊनशान बसलां हुशारी, सरकार! याच बंद्यानं त्येला पडवलं व्हतं, कैद्याकड कोनकोन मनुक्ष येत्यात आन् काय काय करत्यात, त्ये अक्षी नामी ह्येरुनशान ठ्येव म्हून.

**पार्थिव**—तुह्मी काय आणि तुमचा मुलगा काय, एकच नाहीं का?

**खंडेराव**—त्यो ल्योक माझा ल्योक कसला सरकार! त्यो हाय माजा वळ्या--

**पार्थिव**—ह्मणजे?

**खंडेराव**—वळ्या ह्मंजी आयतोळा न्हवका, सरकार?

**पार्थिव**—पण आयतोळा ह्मणजे तरी काय?

**खंडेराव**—आयतोळा ह्मंजी वळ्याच सरकार, अक्षी घेवाच्यान् वळ्या!

**पार्थिव**—पण या दोन्ही शब्दांचा अर्थ तरी काय ?

**खंडेराव**—बरं इचारलंत सरकार ! खिनभर समजा, आपनास्नी हाय येक आवा, आन् तिच्यापस्नं जाला आपनास्नी येक ल्योक—

**पार्थिव**—ठीक ठीक !

**खंडेराव**—आन् मंग आपुन म्येलां----

**पार्थिव**—आं—

**खंडेराव**—आन् आपल्या आवानं माज्यासंग पाट लावला, मंग आपला त्यो ल्योक माजा जाला वढ्या ! आन् त्येलाच ह्मंगत्यात आयतोळा. आलं ध्येनांत सरकार, का पुना सांगूं ?

**पार्थिव**—नको. रगड झालें ! आतां हें पहा, भार्गव हा आरोपीचा जीवश्चकंठश्च मित्र आहे, हें उघड आहे; आणि त्यानेंच ती जाहिरात लिहिली, हें जाहिरातीच्या मसुद्याचें व पत्राचें अक्षर ताडून पाहतां उघड दिसतें. जाहिरात देणाराचा पत्ता लागूं नये ह्मणून भार्गव वर्तमानपत्रकर्त्याला समक्ष भेटलाहि नाहीं; पण मागचापुढचा विचार न करतां धांदलीनें लिहिलेल्या या पत्रांत मात्र तो पुरा अडकला ! जाहिरातींत राजकुलीनास ठेवीचा लाभ होण्याबद्दल जो मजकूर आहे, तो धडधडीत धुरंधराला आमिष दाखवून येथपर्यंत आकर्षून आणण्याकरितांच होता. याबद्दल आरोपीचा जबाब घेतला पाहिजे; आणि त्याच्या जबाबावरून आपल्या अनुमानास बळकटी आली, ह्मणजे भार्गवालाहि पकडलें पाहिजे. कोतवाल, आरोपीच्या खोलींतून विहिरीपर्यंत जी रक्ताच्या बिंदूंची रांग आढळून आली, तिच्यासंबंधानें तुमचा काय तर्क आहे ?

**खंडेराव**—मला वाटतया, कीं हिरीच्या ह्योर खून जाला. ठ्येव हिरीमंदी ठ्येवली हाय असं सांगून ह्माराजांस्नी ततं आनलं असावं, आन् जवा त्ये पगू लागल तवा सुरी खुपासली असल, आन् ततन ह्माराजांस्नी आरोपीच्या कोटरीमंदी न्येल असल, असा माजा तरक धांवतुया.

**पार्थिव**—कोठडींत नेण्याचें कारण काय ?

**खंडेराव**—कपड आन् दागिन काडन्यापायीं.

**पार्थिव**—तुमचें ह्मणणें खरें धरलें, तर प्रेत परत आणतांना दुसरी रांग नको होती का ?

**खंडेराव**—त्येच रांगवरन न्येलं असल आन् काय !

**पार्थिव**—ती रांग आगगाडीच्या रुळासारखी थोडीच आहे, कीं प्रेत परत आणतांना तें बरोबर तिच्यावरूनच जावें! मला वाटतें, कीं खून खोलींतच झाला असावा, आणि तेथून प्रेत विहिरींत टाकण्याकरितां नेलें असावें. तुह्मीं विहीर उपसून पाहिलीत, नाहीं का ?

**खंडेराव**—झाडून संमदा गाळ उपासला, पन मुडदा गावला न्हाई. मंग हिरीखाल्नं सर्गामंदी ग्येला असल त ह्माईत न्हाई.

**पार्थिव**—कोतवाल, खालीं स्वर्ग नसतो, पाताळ असतो.

**खंडेराव**—अक्षी मुललों पगा ! योक राजपुतर पाताळामंदी ग्येला आन् ततन त्येला सरपानी वर आनलं, अशी कथा हाय न्हव पुरानांत ? त्येची मला याद आली.

**पार्थिव**—पुराणें राहूंद्या तूर्त एका बाजूला. प्रेताचें काय झालें असावें असें तुह्माला वाटतें ?

**खंडेराव**—ब्येडकानीं खाऊनशानी त न्हाई गडाप क्येलं ?

**पार्थिव**—ही कांहीं तरी कल्पना आहे झालें. मला वाटतें, कीं तें विहिरींत न टाकतां स्मशानांत नेलें असावें.

**खंडेराव**—रातचं मसनवटांत न्येलं ह्मंता ?

**पार्थिव**—काय हरकत आहे न्यायला ? तुह्मी गेलां होतांना त्या दिवशीं ?

**खंडेराव**—माजं न्यारं. आन् आपली न्हाई बा फिरून तत जाया छाती ह्युयाची !

**पार्थिव**—पण त्याचा तुह्माला शोध करावा लागेल.

**खंडेराव**—रातचा मुडदा बगाया ग्येलों, कीं माजाच मुडदा पडल !

पार्थिव—रात्रीं शोध कसा करणार ? दिवसाच करावा लागेल.

खंडेराव—दिसाचं न्हाई भ्या ! समद मुडद बगुन घ्येतों.

[ जातात.

---

## प्रवेश चवथा.

[ धुरंधर व भार्गव. ]

भार्गव—माझें खरें माना किंवा नका मानूं, पण ती त्रिवेणी खास गैरचालीची आहे.

धुरंधर—भार्गवा, तूंच ह्मटलेंस ह्मणून मीं ऐकून घेतलें. दुसऱ्या कोणीं ह्मटलें असतें तर त्याची जीभच छाटून टाकली असती !

भार्गव—तोंड बंद करण्याचें हें सर्वोत्कृष्ट साधन आहे खरें !

धुरंधर—तुला काय आधार आहे असें ह्मणायला ?

भार्गव—मीं त्या दिवशीं तुह्माला जो व्यसनी ह्मातारा दाखविला होता, तो आहेना लक्षांत ?

धुरंधर--बरें मग ?

भार्गव—त्याच्या घरीं त्रिवेणी कालच रात्रीं गेली होती.

धुरंधर—मग त्यांत काय झालें ? माझ्याबद्दल शब्द टाकायला गेली असेल.

भार्गव—प्रेम अंधळें असतें ह्मणतात, तें अगदीं खरें. प्रेमी माणसाला आपल्या प्रेमविषयाचे ठळठळीत दोषहि दिसत नाहींत.

धुरंधर—तुला तिच्या अंगचे गुण दिसत नाहींत, त्याअर्थीं तुलाहि पण अंधळें ह्मणावें लागेल.

भार्गव—आपणाला ते काय दिसले असतील ते खरे ! मला तर तिच्यांत विशेष असें कांहींच दिसत नाहीं.

धुरंधर—भार्गवा, मला ज्या वेळीं पकडण्यांत आलें, त्या वेळीं ती बिचारी तो सारा प्रकार पाहून मूर्च्छितच झाली. तूं जर त्या वेळीं तेथें असतास, तर तुला तिच्या शुद्ध प्रेमाची खूण पटली असती.

**भार्गव**—तिनें वाराणशीबाईच्या तालमींत राहून कांगाव करण्यांत गंगूवरहि ताण केली ह्मणावयाची!

**धुरंधर**—भार्गवा, काय हें! माझ्या स्थानीं बसून माझी मुक्तता करण्याकरितां ती येथें आली, या तिच्या साहसालाहि तूं कांगावच ह्मणशील?

**भार्गव**—आपण तिला असें साहस करूं देणार नाहीं, हें ओळखण्याइतकी ती धूर्त आहे. मग तिनें हा साहसाचाहि कांगाव कां करूं नये?

**धुरंधर**—अशा रीतीनें तूं प्रत्येक प्रमाणाची विल्हेवाट करीत गेलास, तर मात्र तिचें प्रेम निःसत्त्व ठरेल खरें!

**भार्गव**—आपल्याच तोंडानें या वादाचा निकाल झाला ह्मणायचा!

**धुरंधर**—भार्गवा, चांगलाच इत्यर्थ काढलास माझ्या ह्मणण्याचा! तथापि थांब, असा अधीर होऊं नकोस. या आपल्या चौकशींतच तिच्या निर्मल प्रीतीचें असें बलवत्तर प्रत्यंतर दिसून येईल, कीं त्यानें तुझ्यासारख्या दुराग्रही मनुष्याचा दुष्ट ग्रहसुद्धां पालटून जाईल.

**भार्गव**—असें बडें प्रत्यंतर तें काय दिसणार आहे बुवा!

**धुरंधर**—फार काय, पण प्रसंग पडला, तर ती मजकरितां प्राण देण्यालासुद्धां तयार होईल!

**भार्गव**—प्राण देणाच्या गोष्टी तर राहूंच द्या; तिनें यापुढें आपणाला तोंड दाखविलें ह्मणजे मिळविली!

**धुरंधर**—हा तुझा भ्रम आहे. ती माझ्या जिवाला जीव खात्रीनें देईल.

**भार्गव**—आणि न दिला तर?

**धुरंधर**—तूं काय ह्मणशील तें ऐकेन! फार काय, पण त्या तुझ्या गांवढळ व मूर्ख कुणबाऊ बहिणीशीं जन्माची गांठ बांधून घ्यायला सांगितलेंस, तरी मी तें पत्करीन. आणि जर मी खरा ठरलों, तर तूं पुन्हा त्रिवेणीच्या विरुद्ध ब्रहि काढायचा नाहीं.

**भार्गव**—कबूल. हें पक्कें ना?

**धुरंधर**—अगदीं निर्वाणीचें! (एकीकडे) या पणांत हरण्याची मला तर भीतिच नाहीं.

**भार्गव**—( एकीकडे ) माझ्या ताईसाठीं मला ही पैज जिंकलीच पाहिजे, आणि त्याकरितां त्रिवेणीसारख्या कच्च्या पोरीची मति कुंठित होईल, असें उग्र स्वरूप या खटल्यास मला दिलें पाहिजे. या माझ्या उलट्या मंत्रानें महाराजांवर क्षणभर संकट आल्याचा भास झाला, तरी तें तत्क्षणीं दूर करण्याची तजवीज मीं आधींच करून ठेविली आहे.

[ पार्थिव व खंडेराव प्रवेश करितात. ]

**पार्थिव**—हं, कोतवाल, या भार्गवाला तूर्त बाहेर नेऊन श्रीपतीच्या ताब्यांत द्या. ( खंडेराव भार्गवास पकडतो. )

**भार्गव**—( स्वतःशीं ) हें काय मध्येंच विघ्न उपस्थित झालें ? अशा स्थितींत मी काय करणार ? ( विचार करून ) पण झालें हेंहि एकपरी बरें झालें. कारण आतां मला सरकारतर्फे माफीचा साक्षीदार होऊन महाराजांवरील आरोप दृढ करण्याची आयतीच संधि मिळणार ! ( खंडेराव भार्गवास घेऊन बाहेर जातो व परत येतो. )

**धुरंधर**—तो माझा मनुष्य आहे, हें माहीत असतां तुह्मीं त्याला कैद केलें, याचा अर्थ काय ?

**पार्थिव**—तुमचा आहे ह्मणून तर त्याला पकडावें लागलें. त्यानें तुमचा कावा साधावा ह्मणून जाहिरात दिलेली आह्मांला कळली, तेव्हांच तो तुमचा मनुष्य आहे, याबद्दल आमची खात्री झाली.

**धुरंधर**—त्यानें जाहिरात दिली, हें मला माहीत नाहीं.

**पार्थिव**—असें नाकबूल करून थोडाच फायदा होणार आहे तुमचा !

**खंडेराव**—अव जोशीबुवा, तुमी आजपोतूर तार पगत व्हता, त्ये लई दुरून पगत व्हता. पन आतां त्येंची आन् तुमची गांट घालन्यापायीं तुमास्नी वर पाताळांत--न्हव सरगांत—धाडूनशान् द्येयाचं हाय ! तुमी कितीबी स्वांग केलं, तरीबी त्ये चुकनार हाय ह्मंगता ? सोडा त्ये नांव !

**धुरंधर**—मी ज्योतिषी नाहीं, या राज्याचा मालक धुरंधर तोच मी आहें.

**पार्थिव**—याचा तोतयेपणा आतांपर्यंत लपून राहिला होता,तो तुमच्या तीव्र भाषणानें चवताळून बाहेर आला शेवटीं !

**धुरंधर**—मी राजा आहें, हें तुह्मांला खरें वाटत नाहीं ?

**खंडेराव**—खोटं वाटतया, असं कोन ह्मंतो ल्योक ? आपन आमच राज, अक्षी इस्नूच अवतार !

**पार्थिव**—विष्णूचें चतुर्भुज ध्यान काय शोभतें आहे पण ! (दोघे हंसतात. )

**खंडेराव**—तुमी इस्नू ह्ये पिरथमीवर काईबी सोबत न्हाई.म्हून तुमाला फासावर चडवूनशान् सरगांत धाडायचा आमचा इचार हाय.

**धुरंधर**—मी सांगतों ना तुह्मांला, कीं मी तुमचा राजा आहें !

**खंडेराव**—आपुन जोशी हाऊत असंबी तुमी सांगितलं व्हतं; आतां आमी त्ये खरं समजावं का ह्ये ?

**पार्थिव**—जोशीबुवा, तुह्मी जोशीपणा सोडून राज्याची हांव कशाला धरतां उगीच ? ज्योतिषी पंचांगाचा स्वामी असतो. तो कसाहि असला, तरी सुभाषितकारांच्या मताप्रमाणें चतुरंग सेनेच्या स्वामीपेक्षां श्रेष्ठच ह्मटला पाहिजे !

**धुरंधर**—पार्थिवा, या अडाणी माणसानें मला ओळखलें नाहीं, तर त्यांत मला कांहीं नवल वाटत नाहीं. पण तूं माझा सख्खा भाचा, असें असतां तुलाहि माझी ओळख पटूं नयेना ? दुर्दैव माझें !

**खंडेराव**—आमी अडानी गडी असलों, तरीबी खुनी मानसापरीस ब्येस !

**धुरंधर**—मीं खून केला ? कोणाचा ? आपला स्वतःचाच ?

**खंडेराव**—ह्माराज, ह्येन स्वांग त अक्षी नामी आनलय पगा. मी तर थक जालुया ! ( दोघे हंसतात. )

**धुरंधर**—पार्थिवा, तूं माझा भाचा आहेस, या आशेवर मीं भिस्त ठेवली, ही माझी चूक झाली. खरोखर पाहूं गेलें, तर तूं माझा इतक्या

जवळचा संबंधी आहेस, हीच गोष्ट तूं मला प्रतिकूल होण्यास पुरेशी आहे.

**पार्थिव**—वारस ह्मणून केवळ राज्याचीच जर मला हांव असती, तर माझ्या प्रिय धुरंधराच्या वधाबद्दल सूड घेण्याच्या नादीं मी कशाला लागलों असतों ? उलट मीं तुला आपला उपकारकर्ता मानून तुझ्या सुटकेची खटपट केली असती.

**धुरंधर**—(एकीकडे) मी ज्योतिषी आहें, ही समजूत या मूर्खांच्या हाडींमाशीं इतकी खिळलेली आहे, कीं ती घालविणें अत्यंत कठिण काम होऊन बसलें आहे. यांच्याशीं बोलून तोंडाची वाफ दवडण्यांत कांहीं हांशील नाहीं. (उघड) मी राणीसाहेबांची साक्ष देणार आहें, त्या साक्षींत खऱ्याखोट्याचा तेव्हांच उलगडा होईल.

**पार्थिव**—राणीसाहेबांची साक्ष तुला घेऊं देतो कोण ? त्यांच्या मुलाचा खून करणारासमक्ष त्यांना येऊं दिलें, ह्मणजे त्यांच्या प्राणावर घाला घालण्याची संधि त्याला आयतीच आणून दिल्यासारखें होईल. तुला काय ? तूं जिवावर उदार झाला आहेस. या औदार्याच्या भरांत जितके जीव तावडींत सांपडतील, तितक्यांवर पाणी सोडण्याला तूं तयार आहेसच. तूं एक सोडून दोन खून केलेस, तरी तुझा दोनदां तर जीव घेतां येत नाहींना ?

**धुरंधर**—तर काय तुह्मी ज्या भयंकर खुनाचा मजवर आरोप करतां, तोच भयंकर खून तुह्मी माझा करणार ?

**पार्थिव**—तुला फांसावर लटकावून तुझें डोकें आईसाहेबांना भेट ह्मणून घेऊन जाऊं, तेव्हांच प्रथम त्यांना धुरंधराच्या वधाची हकीकत कळवूं.

**धुरंधर**—मूर्खांनो, माझें डोकें आईसाहेबांना नजर करून तुह्मी त्यांचा क्रोधाग्नि शांत करणार, कीं प्रदीप्त करणार ? तो तुह्मां सर्वांच्या शिरांची आहुति घेईल, हें पूर्णपणें समजून असा.

**पार्थिव**—आतां हा अगदीं बेफाम होऊन गेला आहे. याची धुंदी शिक्षा ऐकल्याशिवाय कांहीं कमी होणार नाहीं. तेव्हां येथें याला असाच बडबडत ठेवून निघून जाऊं. मात्र आतां त्या भार्गवाकडून हिकमतीनें खुनाचें साद्यंत वर्तमान काढून घेतलें पाहिजे.

**खंडेराव**—ती हिकमत बिकमत न्हाई मी वळकीत. येक चवदावं रतन मातुर आमाख्री ठावं हाय. दावला येक येक सपाटा, झंजी मंग येताळबी पाया पडाया लागायचा, आन् तुह्मी झंगाल त्ये समदं आना खाऊनशानी बकायचा. अक्षी देवाला इसमरून !

**पार्थिव**—मग कांहीं हरकत नाहीं.

[ जातात.

**धुरंधर**—गेल्या एकदांच्या ब्यादी ! यांच्या व त्रिवेणीच्या बोलण्या-वरून खटल्याच्या निकालाबद्दल मात्र जबरदस्त शंका वाटूं लागली आहे. काय होईल तें खरें !

[ पडदा पडतो. ]

---

## प्रवेश पांचवा.

[ पार्थिव व गंगू. ]

**गंगू**—मागें आपण माझ्या घरीं आलां होतां, आतां मी आपण होऊन आपणाकडे आपली समजूत घालायला आलें आहें.

**पार्थिव**—गंगू, तूं इतके कशाला आयास घेतलेस ?

**गंगू**—आपल्या मजबद्दल झालेल्या प्रतिकूल ग्रहामुळें माझ्या मनाला जे आयास होत होते, त्यांच्यापुढें यांची बडेजाव ती केवढी !

**पार्थिव**—मी तुजकडे आलों होतों, तेव्हां तुझी बाजू भक्कम असून माझी लंगडी होती. आतां आपल्या स्थानांची अदलाबदल झाली आहे. तूं जसें मला तुच्छतेनें झिडकारून टाकलेंस, तसें मलाहि आज तुला झिडकारतां येईल.

**गंगू**—आपण माझ्या वर्तनाचा विनाकारण विपरीत ग्रह करून घेतला आहे.

**पार्थिव**—तर काय, तुझी प्रीति त्या वेळींहि मजवर जडली होती ह्मणतेस ?

**गंगू**—मीं तोंडानें सांगून काय उपयोग ? माझें पुढील वर्तनच माझ्या मनाचा निर्मलपणा सिद्ध करून दाखवील.

**पार्थिव**—मग त्या वेळीं मजवर वाघिणीसारखी चवताळून कां आलीस ?

**गंगू**—माझा हेतु केवळ आपलें प्रेम किती प्रबळ आहे, हें पाहण्याचाच होता. पण महाराज, माझ्या दुर्दैवानें तें फारच कच्चें दिसून आलें. हें मी स्पष्ट सांगतें, याबद्दल मला क्षमा असावी.

**पार्थिव**—एकूण मी निगरगट्टपणा आणि निलाजरेपणा करून आणखी कांहीं वेळ तसाच बसलों असतों, आणि तुझ्या नोकराकडून दोनचार गचांड्या आणि गुद्दे खाल्ले असते, तर तें प्रेम फारच दांडगें ठरलें असतें, नाहीं बरें ? निदान माझी मान व पाठ तरी फार टणक ठरली असती खरी !

**गंगू**—आपण थट्टाच करूं लागलां, तर मी त्यावर काय बोलणार ?

**पार्थिव**—बरें गंगू, माझें प्रेम जर इतकें निःसत्त्व होतें, तर तूं मजकडे आज आलीस कशाला ?

**गंगू**—महाराज, पुरुषांनीं कितीहि निर्दयपणा केला, तरी बायकांचें मन वेडें असतें, हेंच खरें. प्रेमाला लाजलज्जा कांहीं माहीत नसते. आपलें प्रेम निःसत्त्व असेल, पण तें बलवत्तर करण्याचा आमचा धर्म आहे. त्याला जर आह्मी जागलों नाहीं, तर स्त्रियांच्या नांवाला तें एक कायमचें लांछन होणार आहे. ( हंसून ) महाराज, माझा हेतु आतां तरी आपल्या ध्यानांत आला का चांगलासा ?

**पार्थिव**—गंगू, तुह्मी स्त्रिया हुषार खऱ्या ! कोणत्या पुरुषाच्या मनोदुर्गाला कुणीकडून सरबत्ती सुरू केली ह्मणजे तो सर करितां येईल,

याचें तुह्मांला जसें कांहीं बाळकडूच मिळालेलें असतें. माझ्या मनाचें छिद्र तूं बरोबर ओळखलेंस. मी फार स्त्रैण आहें. लुसलुशीत आणि लाल ओंठांनीं मला शिव्या जरी दिल्या, तरी त्या मला गोड वाटतात; आणि रसरशीत व गोंडस हातांनीं माझी मान जरी कापली, तरी मी हूं का चूं करणार नाहीं!

**गंगू**—अजून आपलें समाधान झालें नाहीं तर?

**पार्थिव**—मी हा असा भडकत चाललों आहे, हें समाधान न होण्याचें लक्षण का? तुझ्या ओंठांनीं आणि हास्यानें माझें पुरें समाधान झालें. तुझ्या हातून आजपर्यंत जे जे अपराध घडले असतील, त्यांची मी सरसहा क्षमा करतों.

**गंगू**—आई आंत मोठ्या फिकिरींत बसली आहे. तिला हें आनंदाचें वर्तमान कळविलें पाहिजे.

**पार्थिव**—चल, मीहि येतों तिकडे.

[ जातात.

---

## प्रवेश सहावा.

**विश्वेश्वरशास्त्री** (प्रवेश करून)—आज जोशीबुवांवरचा खुनी खटला राजकीय ह्मणून गुप्त रीतीनें चालावयाचा असून त्या प्रसंगीं सकुटुंब हजर रहाण्याची मला आज्ञा झाली होती, ह्मणून मी किती वेळापासून तरी निघण्याच्या तयारीनें बसलों होतों. पण अखेर या झोंपेनें बिघाड केलाच ! झोंपेंतसुद्धां किती चमत्कारिक स्वप्न पाहिलें मीं! जोशीबुवांवर आरोप लागू होऊन त्यांना फांशीची शिक्षा झाली, आणि त्यांना फांसावर चढवितांना माझी लाडकी त्रिवेणी तेथें हंबरडा फोडीत आली व त्यांच्याबरोबर फांसावर चढली. इतक्यांत काय चमत्कार झाला, कीं त्या फांसाचें विवाहसूत्र व त्या मांगाचा उपाध्याय होऊन प्रेक्षकांच्या डोळ्यांतून आंसवें पडण्याऐवजीं त्यांच्या हातून अक्षतांचा

वर्षाव झाला! स्वप्नच तें! तेथें एकाची दुसऱ्याशीं संगति पाहूं गेल्यास सांपडावयाची नाहीं. स्वप्नाचा प्रत्यय बहुधा अगदीं उलट येतो ह्मणतात, तसाच येथेंहि प्रकार झाल्यासारखा दिसतो. जोशीबुवा या खटल्यांतून सुखरूप बाहेर पडणार नाहींत, असें जो तो ह्मणत आहे. असो. आपणाकडून त्यांना थोडी तरी मदत झाली तर पाहूंया.

[ जातो.

---

## प्रवेश सातवा.

[ प्रयागपंडित उच्चासनावर बसले आहेत; खालच्या बाजूस पार्थिव, वाराणशी, गंगू, यमुना, त्रिवेणी, म्हाळसा हीं बसलीं आहेत; आरोपीच्या पिंजऱ्यांत धुरंधर राजकीय पोषाकांत उभा आहे; जवळ खंडेराव व श्रीपति उभे आहेत; साक्षीदाराच्या पिंजऱ्यांत भार्गव उभा आहे; विश्वेश्वरशास्त्री प्रवेश करून बसतात. ]

**भार्गव**—( एकीकडे ) मी यांनीं ह्मटल्याबरोबर सरकारतर्फे माफीचा साक्षीदार ह्मणून साक्ष देण्यास तयार झालों खरा; पण यांना माहीत नाहीं, कीं मी आरोपीविरुद्ध कांहीं जरी सांगितलें, तरी त्याच्या एका हुंकाराबरोबर त्याच्यावरील सर्व संशयमेघांची वाताहत होऊन जाईल! व जरी न झाली, तरी अखेरचें ब्रह्मास्त्र पुढें आल्यावर हा सारा डोलारा निःसंशय गडबडलाच पाहिजे. पण धुरंधरमहाराजांना मजबद्दल काय वाटेल? गाईच्या दुधावर पोसलेल्या व तिच्यावरच शस्त्र उगारणाऱ्या कसाबाच्यापेक्षां, किंवा प्रेमानें पालन करणाऱ्या धन्यास दंश करूं पहाणाऱ्या काळसर्पाच्यापेक्षांहि माझी कृति त्यांना भयंकर वाटेल. पण मला कांहीं वेळ तरी त्यांचा मजविषयींचा संशय व त्यांना त्यापासून होणाऱ्या प्राणांतिक वेदना सहन केल्या पाहिजेत. माझी निर्दोषता व स्वामिभक्ति भविष्यकालच सिद्ध करून दाखवील. ( उघड ) महाराज, मला

या खटल्यांत माफीचा साक्षीदार केलें आहे, हे मी सरकारचे उपकार मानितों, आणि या खुनाबद्दल मला माहीत असलेली सर्व इत्थंभूत हकीकत न्यायासनापुढें मांडितों. आरोपीचा मी जिवलग मित्र आहें.

**विश्वेश्वर०**—( एकीकडे ) माफीचा साक्षीदार ह्मणून विरुद्ध साक्ष देण्याला येतो आहे, तेव्हां जिवलग मित्र खराच !

**यमुना**—( एकीकडे ) यांच्यावर माझें जें प्रेम होतें, तें एका क्षणांत नाहींसें झालें.

**भार्गव**—याच्या आणि धुरंधरमहाराजांच्या चेहऱ्यांत जें विलक्षण साम्य आहे, तें मला अगदीं अलीकडे कळलें. महाराज विलायतेहून परत येऊन जेव्हां बंदरांत उतरले, तेव्हां त्यांना दाढी असल्यामुळें तें साम्य त्या वेळीं उमगलें नाहीं. पण ज्या दिवशीं त्यांनीं दाढी काढून टाकिली, त्या दिवशीं मात्र तें साम्य कळून आलें. त्याच दिवशीं आमचें उभयतांचें गादी बळकावण्याबद्दलचें कारस्थान ठरलें. महाराजांना आपल्या वाड्यांतून उचलून त्यांचे जागीं आरोपीची योजना करावी, असा आमचा विचार ठरला.

**धुरंधर**—( एकीकडे ) माझ्यावरचा राग भार्गव अशा रीतीनें काढीत आहे, किंवा त्याला अधिकाऱ्यांनीं छळल्यामुळें हें बोलावें लागत आहे, अथवा आपल्या साक्षीनें माझें कांहीं नुकसान होणार नाहीं, ह्मणून हा तोंडास येईल तें बडबडत सुटला आहे ? कांहीं कळत नाहीं !

**भार्गव**—आमचें कारस्थान ठरलें खरें; पण तें ठरत असतां एका हेरानें ऐकिलें, आणि अधिकाऱ्यांच्या कानांवर घातलें. तेव्हांपासून महाराज कोणाच्याहि दृष्टीस पडेनासे झाले, व त्यांच्यावर कडक पहारा राहूं लागला. यामुळें आमच्या मार्गांत एक मोठेंच विघ्न आल्यासारखें झालें. नंतर आह्मी या शहरांत आलों, व निरनिराळ्या घरांचा आश्रय घेऊन राहिलों. आमची परस्परांची मैत्री आहे, याचा कोणास सुगावा लागूं नये ह्मणून आह्मी परस्परांच्या भेटीहि उघडपणें घेत नसूं. शहरांत

आल्यावर लागलीच दुंदुभिवर्तमानपत्रांत जाहिरात देऊन महाराजांना आमच्या कारस्थानाच्या टापूंत आणण्याचा आमचा विचार ठरला, व त्याप्रमाणें मीं एक निनांवी जाहिरात व ती छापण्यास लागणाऱ्या खर्चाच्या दसपट रक्कम दुंदुभिकर्त्याकडे पोंचती केली. त्यानेंहि पैशाच्या लोभानें ती जाहिरात जशीच्या तशीच प्रसिद्ध केली. ती न्यायासनापुढें आलीच असेल. आह्मीं अटकळ केल्याप्रमाणें धुरंधरमहाराज खुनाच्या दिवशीं संध्याकाळीं एकटेच घोडा दामटीत शहरांत येऊन दाखल झाले. आह्मीं त्यांस ठेव विश्वेश्वरशास्त्र्यांच्या वाड्यामागच्या विहिरींत आहे असें सांगून त्या विहिरीपाशीं नेलें, व तेथें आरोपीनें त्यांना बरचीनें पाठींत भोंसकून निमिषार्धांत ठार केलें. नंतर आह्मीं लगबगीनें त्यांच्या अंगावरील वस्त्रें व अलंकार काढून घेतले; व ते घेऊन आरोपी वाड्याकडे निघून गेला. मी महाराजांची मोट करून व ती पाठीवर घेऊन स्मशानाकडे निघून गेलों, व तेथें जळत असलेल्या एका चितेंत तें गाठोडें टाकून देऊन परत आलों. महाराजांच्या पाठीवर जी जखम झाली होती, तिच्यामुळें आंतील पैरण रक्तानें भरली होती, व बाहेरचा अंगरखाहि किंचित् फाटला होता.

**खंडेराव**—( एकीकडे ) अंगरख्याला तर म्या असं नामी भ्त्राक पाल्डया, कीं जनु त्येला बरचीच लागलिया !

**भार्गव**—रक्तानें भरलेली पैरण वाड्यांत नेतांना जमिनीवर रक्ताचे थेंब पडत गेले. मी स्मशानांतून परत आल्यानंतर आह्मीं दोघांनीं ती पैरण जाळून टाकिली, आणि राख मीं परत येतांना विहिरींत फेंकून दिली. मी परत आल्यावर आरोपीला जमिनीवर पडलेल्या रक्ताच्या थेंबांवरून कृतकर्माच्या परिणामाबद्दल चिंता वाटून त्यानें शास्त्रीबुवांच्या मनांत आरामबागेंतील वनभोजनाचा विचार भरविला असावा. मला त्याबद्दल प्रत्यक्ष कांहींच माहिती नाहीं. झाली, माझी जबानी संपली.

**धुरंधर**—( एकीकडे ) मी धुरंधरच आहें, कीं तोतया आहें, याचा माझा मलाच संशय वाटूं लागला आहे !

**भार्गव**—( एकीकडे ) माझ्या स्नेहाबद्दल यांचा फारच अनुकूल ग्रह झाला असेल ! पण अजूनहि कांहीं वेळ मला दम धरिला पाहिजे. उतावीळपणानें सारेंच फसावयाचें !

**प्रयाग०**—जोशीबुवा, तुह्मांला या साक्षीदाराला कांहीं विचारावयाचें आहे का ?

**धुरंधर**—ज्याला मी आपला उजवा हात समजत होतों, त्यानेंच जर माझ्या पोटांत शस्त्र खुपसलें, ज्याला मी आपल्या गळ्यांतला ताईत समजत आलों, त्यानेंच जर मला गळफांस लाविला, तर त्याला प्रश्न विचारण्याइतकें अवसान व बळ मला कुठून राहणार ? जगांतून सत्य आणि प्रामाणिकपणा निघून गेल्यावर त्यांत राहण्यांत तरी काय मौज राहिली ? पंडितमहाराज, मला याला कांहींसुद्धां विचारावयाचें नाहीं. माझ्या देहाची वाटेल ती वाट लावण्याला माझ्या स्नेह्याला अधिकारच आहे.

**भार्गव**—( एकीकडे ) यांनीं माझ्यावर अत्यंत तीव्र भाषेचा प्रहार केला असता तरी तो पुरवला असता; पण यांच्या कोमल शब्दांनीं माझ्या हृदयाचें पाणी पाणी होऊन जात आहे.

**प्रयाग०**—जोशीबुवा, तुमच्याविरुद्ध काय काय पुरावा झाला हें तुह्मीं पाहिलेंच. तुमचें महाराजांशीं दाढीशिवाय इतर बाबतींत फारच आश्चर्यजनक साम्य आहे, यांत शंका नाहीं. आज आह्मीं मुद्दाम तुमच्या अंगावर मुद्द्याच्या मालापैकीं कपडे व अलंकार चढवून पाहिले, तों तुमची मूर्ति महाराजांच्या प्रतिकृतीशीं हुबेहुब जुळून, स्वतः महाराजच समोर उभे असावेत असा क्षणभर भास झाला. या साम्याच्या जोरावर तुह्मीं कोणतें कारस्थान योजिलें आणि तें बऱ्याच अंशीं कसें पार पाडिलें, तें तुमचाच स्नेही भार्गव याच्या साक्षींत पूर्णपणें आलें आहे. त्याला बळकटी येण्यासारखा पुरावा पार्थिव व खंडेराव यांच्या साक्षींत आला आहे. त्या वस्त्रामधून अंगणांत रक्ताचे थेंब जर पडले नसते,

व आरामबागेकडे जाण्याऐवजीं तुह्मी महाराजांचा पोषाख घालून व त्यांच्याच घोड्यावर स्वार होऊन त्यांच्या बंदरांतील वाड्यांत गेलां असतां, ह्मणजे ही गोष्ट उघडकीला येण्याचें कारण नव्हतें. पण पाप उघडकीला येण्याला देव कोणतें ना कोणतें तरी निमित्त पुढें करितोच. असो. तुह्मी या शहरांत आल्यावर महाराजांशीं आपलें साम्य असल्याबद्दल बरेच वेळां बोललां होतां, असें खंडेराव, वाराणशी, गंगू व यमुना यांच्या साक्षींवरून उघड होतें. गंगूच्या साक्षीवरून तर असेंहि दिसतें, कीं तुह्माला महाराजांबद्दल हेवाहि वाटत असावा. तुह्मी खुनानंतर लागलीच आरामबागेकडे चालते झालांत, हीसुद्धां तुमच्याविरुद्ध लक्षांत घेण्यासारखी महत्त्वाची गोष्ट आहे. तुह्माला पकडण्याकरितां पार्थिवराज, खंडेराव व श्रीपति आले असतां तुह्मी दचकून काळेठिक्कर पडलांत, असें त्यांच्या साक्षींवरून दिसतें. तुह्माला विहिरीजवळ नेऊन जेव्हां तेथें पडलेलें रक्त दाखविलें, व हें रक्त कोणाचें आहे हें तुह्माला माहीत आहे का ह्मणून विचारिलें, तेव्हां तुह्मीं 'माहीत असेल' असा जबाब दिला, तोहि मोठा संशयास्पद होता. तुह्मी हल्लीं जोरानें प्रतिपादीत आहांत त्याप्रमाणें जर खरोखरच धुरंधरमहाराज असतां, तर ती गोष्ट तुह्मी प्रथमच सांगून टाकली असती. पण तुह्मी कांहीं वेळ कारागृहांत शांतपणें विचार केल्यानंतर तुह्मास आपला खोटा हक्क पुढें करण्याचा विचार सुचला असें दिसतें. यासंबंधानें विशेष लक्षांत ठेवण्यासारखी ही गोष्ट आहे, कीं तुह्मी या शहरांत आलांत त्यानंतर बऱ्याच दिवसांनीं महाराज आपल्या वाड्यांतून नाहींसे झाले. ही गोष्ट प्रत्यक्ष आईसाहेबांच्या पत्रांत नमूद केलेली आहे. तेव्हां तिच्यासंबंधानें संशय घेण्याचें कारण नाहीं. शिवाय तुह्मी येथें असतां, महाराजांस बंदरांत समक्ष पाहिल्याचें खंडेराव कोतवालांनीं शपथेवर सांगितलें. तुह्मीं एकाहि साक्षीदाराची उलटतपासणी केली नाहीं, हीसुद्धां गुन्ह्याबद्दल तुमची अप्रत्यक्ष कबुलीच आहे.

धुरंधर—पंडितमहाराज, या विलक्षण खटल्यांत फिर्यादी सरकार, आरोपी सरकार, व खून झालेला इसमहि सरकारच, असा मोठा चमत्कारिक योग जुळून आला आहे! पर्यायानें ह्मणावयाचें झाल्यास मी माझा स्वत:चा खून करून स्वत:वरच त्या खुनाचा आरोप करीत आहें, असा अपूर्व प्रसंग मजवर आला आहे! पंडितमहाराज, ज्या गोष्टी मीं कांहीं अंत:स्थ कारणाकरितां बाह्यात्कारीं धारण केल्या होत्या, त्या आपण माझ्या स्वत:च्या ह्मणून गृहीत धरितां; आणि ज्या गोष्टी माझ्या स्वत:च्या आहेत, त्या मीं बतावणी करण्याकरितां पुढें केल्या आहेत असें आपण समजतां; यामुळें या खटल्याला हें गंभीर स्वरूप आलें आहे. हा देह ह्मणजे खुद्द धुरंधराचाच; पण आपण समजतां, कीं हा त्याच्याशीं सदृश आहे. मी वास्तविक आहें राजा; पण आपण समजतां, कीं मी तोतया असून राजाचें नुस्तें सोंग आणिलें आहे. मला ज्योतिष्याचा वेष कांहीं कारणांकरितां घ्यावा लागला; आपण समजतां, कीं तोच माझा खरा पेशा. माझें येथील वास्तव्य गुप्त रहावें ह्मणून, मी तोतयाचे धास्तीनें आपल्या वाड्यांत एकटाच बंदोबस्तानें रहात असतों, अशी बातमी उठविण्याचें आईसाहेबांनीं व मीं मुद्दाम ठरविलें; परंतु आपण माझा तेथील वास खरा समजतां, व येथील माझें कृत्रिम वेषानें रहाणें खोटें समजतां. माझ्या वास्तविक स्वरूपाबद्दलचें माझें प्रथमचें मौन मुद्दाम स्वीकारलेलें होतें; तें आपण स्वाभाविक मानितां, आणि माझें मागाहूनचें प्रकटीकरण कृत्रिम मानतां!

प्रयाग०—जोशीबुवा, तुह्मीं रचलेली हकीकत फार चातुर्यानें रचलेली आहे, यांत शंका नाहीं. ज्याप्रमाणें अत्यंत स्वाभाविक दिसणारें चित्र तयार करण्यांतच चित्रकाराचें खरें कौशल्य दिसून येत असतें, त्याप्रमाणें आपली हकीकतहि सहजगत्या घडलेली अशीच भासत असल्यामुळें आपल्या कल्पकतेची तारीफ करावीशी वाटते. परंतु आपणास जोंपर्यंत त्या अंत:स्थ कारणांचा उलगडा करितां येत नाहीं,

तोंपर्यंत त्या कारणांची सबब केवळ सर्व गोष्टींची संगति लावण्याच्या असमर्थतेमुळें पुढें केली आहे, असेंच कोणासहि वाटणार आहे.

**धुरंधर**—तीं कारणें मला न्यायासनापुढें मांडितां येत नाहींत, याला माझा निरुपाय आहे. तीं गुप्त ठेवण्याबद्दल मला मरण जरी आलें, तरी त्याला माझी तयारी आहे!

**विश्वेश्वर०**—पंडितमहाराज, जोशीबुवांचा मला थोड्याच काळांत इतका परिचय झाला आहे, कीं त्यांच्या शीलासंबंधानें मला बोलण्याचा अधिकार आहे, असें मी समजतों. महाराज, त्यांचें मन इतकें उदार, व वर्तन इतकें निर्मल आहे, कीं त्यांच्या हातून असा भयंकर गुन्हा घडेल असें मला स्वप्नांतहि वाटणार नाहीं. यांना आपण धुरंधरमहाराज असल्याबद्दल जो भास होत आहे, तो केवळ या संकटामुळें मस्तक फिरण्याचाच परिणाम आहे. याउप्पर आपल्याला काय वाटेल तें खरें.

**धुरंधर**—बाबासाहेब, मजकडून आपली जी यत्किंचित् सेवा घडली, तिचें स्मरण ठेवून आपण मजकरितां येथपर्यंत येण्याचे आयास घेतलेत, आणि प्रसंगीं माझ्या तर्फेनें चार शब्द बोलण्यासहि मागेंपुढें पाहिलें नाहीं, याबद्दल मी आपला जन्माचा ऋणी आहें. पण माझा जन्म तरी आतां किती अल्प अवधीचा राहिला आहे! माझें हक्काचें पद जर मला मिळालें असतें, तर आपल्या उपकारांचें ऋण अंशतः तरी फेडण्याचें मजमध्यें सामर्थ्य असतें.पण त्याच्या अभावीं आपल्या हितचिंतनापलीकडे मला कांहींच करितां येत नाहीं, याबद्दल फार खेद वाटतो. ईश्वर आपलें सदैव कल्याण करो!

**पार्थिव**—( एकीकडे ) अजून राजाचें सोंग यानें कायमच ठेविलें आहे!

**प्रयाग०**—बाबासाहेब, आपण आमच्या भावी राजाचे श्वशुर आणि या शहरांतील एक अत्यंत संभावित व थोर गृहस्थ, अशा दुहेरी दृष्टीनें आपल्या वचनाचा योग्य विचार करण्यांत येईल. पण आरोपीनें केलेल्या

आपल्या सेवेबद्दल त्यानेंच स्वमुखानें इतक्यांत जी कबुली दिली, तिच्याबरोबर आपल्या वचनाचा विचार केला, तर खटल्याचें पारडें फिरवून टाकण्याइतकें त्याला महत्त्व देतां येणार नाहीं, याबद्दल दिल-गिरी वाटते. जोशीबुवा, तुह्माला आपणातर्फे कोणी साक्षीदार द्याव-याचा आहे का ?

**धुरंधर**—मी खुद्द आईसाहेबांचीच साक्ष देतों. याहून विश्वसनीय साक्ष या संस्थानांत दुसरी कोणती मिळणार ?

**प्रयाग०**—जोशीबुवा, तुमच्याविरुद्ध झालेला पुरावा, विशेषत: तुम-च्याच स्नेह्याची साक्ष आणि तुरुंगांत पार्थिवराज व कोतवाल यांना दिसून आलेलें तुमचें उच्छृंखल वर्तन, हीं लक्षांत घेतां, राणीसाहेबांची साक्ष देण्यांत तुमचा हेतु राणीसाहेबांचा उपमर्द करण्याचा व हा खटला विनाकारण त्रास देऊन लांबविण्याचा दिसतो. ह्मणून ही तुमची विनंति आह्माला मान्य करितां येत नाहीं. शिवाय राणीसाहेबांनीं पत्रांत लिहिलें आहे, त्याहून निराळी साक्ष त्या थोडीच देणार आहेत !

**धुरंधर**—जेथें मनुष्याच्या जीविताचा प्रश्न आहे, तेथें आपण अशा कमकुवत अनुमानाच्या जोरावर आरोपीच्या कायदेशीर हक्काची पायमल्ली करून योग्य पुरावा घेण्याचें नाकारितां, हें न्यायाचें होत नाहीं खास !

**प्रयाग०**—या तुमच्या उद्दाम भाषणावरून माझ्या अनुमानास बळ-कटीच येत आहे.

**धुरंधर**—अशा रीतीनें मला खुनी ठरवून आपण मात्र माझा खून करीत आहांत; आणि असेंच जर करावयाचें होतें, तर हें कायदेशीर चौकशीचें नाटक कशाला हवें होतें ? मी आपल्या बचावाची इतर कोणतीहि तर्तुद न करितां आमच्या न्यायाधीशांच्या न्यायबुद्धीवर विश्वसून स्वस्थ राहिलों, हा माझा केवढा मूर्खपणा झाला ! खुद्द स्नेह्यानें उलट साक्ष द्यावी, व न्यायाधीशानें न्यायाकडे अशा रीतीनें डोळेझांक

करावी, हे असले उलटे प्रकार माझ्या दैवाच्या प्रतिकूलतची साक्ष पटवीत आहेत!

**प्रयाग०**—मग याशिवाय तुमचा दुसरा कांहीं पुरावा नाहीं तर?

**धुरंधर**—नाहीं.

**त्रिवेणी**—नाहीं कसा? महाराज, माझी या प्रकरणांत साक्ष घेण्यांत यावी.

**प्रयाग०**—मुली, अशी समोर उभी रहा. (त्रिवेणी पिंजऱ्यांत उभी राहते.)

**भार्गव**—(एकीकडे) माझी हिच्याविषयींची अटकळ चुकली कीं काय? तथापि अशा संगीन पुराव्यापुढें हिचें काय चालणार?

**प्रयाग०**—(एकीकडे) अरे, ही तर मजकडे आलेली मुलगी! खुद्द आरोपीची रमणी! हिच्या साक्षीपासून त्याला काय लाभ होणार?

**धुरंधर**—(एकीकडे) मजवर आलेल्या संकटामुळें त्रिवेणीचे सद्गुण माझ्या प्रत्ययास आले, हा त्या संकटाचा मी उपकारच समजतों. मला अशा प्रसंगीं ईश्वरावरील निष्ठेची फार जरूर आहे; आणि त्रिवेणी-सारख्या सर्वांगसुंदर बालिकेकडे पाहिलें ह्मणजे हिला निर्माण करणारी कोणी तरी महासमर्थ, त्रिकालज्ञानी, व अत्यंत दयाळु अशी विभूति असली पाहिजे, असा दृढ विश्वास वाटूं लागतो.

**वाराणशी**—(एकीकडे) ही कारटी निघण्यापूर्वीं हिला मीं जरा झुळझुळीत नेसायला दिलें, हें चांगलें झालें. नाहींतर हिनें आमच्या घराण्याचें नांव घालविलें असतें!

**प्रयाग०**—मुली, तुझें नांव काय?

**त्रिवेणी**—त्रिवेणी.

**प्रयाग०**—तुझा विवाह झाला नसेलच. तुझ्या पित्याचें नांव काय?

**त्रिवेणी**—पित्याचें नांव त्या सर्वसाक्षी परमेश्वरासच माहित!

**प्रयाग०**—तुझ्या ह्मणण्याचा अर्थ मी नाहीं समजलों.

त्रिवेणी—महाराज, लहानपणींच जन्मदात्यानें टाकून दि
एक पोरकी मुलगी आहें.

प्रयाग०—काय ह्मणतेस? तुझ्या जन्मदात्यानें तुला नि
एकटी सोडून दिली? आणि आपली कोणतीहि खूण तुझ्य
ठेवितां?

त्रिवेणी—फक्त एक जस्ती ताईत मात्र मी माझ्या गळ्यांत
पासून वागवीत आलें.

प्रयाग०—तो हल्लीं तुझ्याजवळच आहे का?

त्रिवेणी—नाहीं. मीं तो कांहीं कारणामुळें माझी मैत्रीण यमु
स्वाधीन केला.

प्रयाग०—तुझ्या अगोदर ज्या यमुनेची साक्ष झाली,
यमुना?

त्रिवेणी—होय.

प्रयाग०—यमुने, तो ताईत तुझ्यापाशीं अजून आहे का

यमुना—नाहीं महाराज, मीं तो कांहीं कारणामुळें
गळ्यांत घातला आहे.

प्रयाग०—एकूण ह्माळसेच्या गळ्यांतील ताईत हिचाच त
तो तुह्मीं कधीं उघडून पाहिला होता का?

यमुना—होय महाराज! त्यांत हा कागद आढळून आला
देते.)

प्रयाग०—(कागद पाहून व खिशांतील कागदाशीं जुळवून
ही खास माझीच मुलगी! ही मजकडे रदबदली कर
आली असतां हिला पाहून माझें चित्त उचंबळून व
गेलें होतें, याचें रहस्य मला आतां उमगलें. आणि मी आत
मुलीच्या वल्लभाला मृत्यूची शिक्षा देणार ना! देवा, तुझी ली
आहे! माझ्या उरफाट्या कृत्याबद्दल तूं हें योग्य प्रायश्चित्त दि

असें उद्विग्न बसून कसें चालणार ? पुढें आलेलें कर्तव्य बजाविण्याकरितां मन दगडासारखें कठिण केलें पाहिजे. ज्या माझ्या मुलीचें दर्शन होण्याची मी आजपर्यंत चातकासारखी वाट पहात होतों, तिचें दर्शन झालें असतांहि तिला हृदयाशीं धरण्याची इच्छा मला न्यायासनाच्या इभ्रतीकरितां मनांतल्या मनांत दाबून ठेविली पाहिजे; आणि कागदावरील मजकूर धुऊन नाहींसा होईल, या भीतीनें ही अश्रूंची धार थांबविली पाहिजे. ( उघड ) मुली, तुला या खटल्यासंबंधानें काय माहिती आहे ?

**त्रिवेणी**—महाराज, जोशीबुवांवर जो खुनाचा आळ आला आहे, तो सर्वस्वी निराधार आहे.

**प्रयाग०**—मग तुझ्या समजाप्रमाणें खून कुणीं केला असावा ?

**त्रिवेणी**—( स्वगत ) देवा, साऱ्या जन्मांत प्रथमतःच, आणि तेंहि प्रेमासाठीं, असत्य बोलण्याबद्दल मला क्षमा कर. सत्यापरता धर्म नाहीं, असें मीं आजपर्यंत मानून त्याप्रमाणें आचरणहि केलें. पण देवा, सत्य आणि प्रेम यांमध्यें विरोध दिसूं लागल्याबरोबर मी प्रेमाकरितां सत्याला झुगारून देत आहें, याची क्षमा कर. तूं न्यायी आहेस, तसा दयाळुहि आहेस. पण देवा, तूं आपल्या भक्तांना जो इतका प्रिय वाटतोस, तो आपल्या न्यायीपणामुळें वाटत नसून प्रेमळपणामुळें वाटतोस. तर माझा हा पहिला व शेवटला अपराध तूं पोटांत घालणार नाहींस का ?

**प्रयाग०**—मुली, खऱ्या खुनी माणसाचें नांव घेण्याला तुला शंका वाटते का ?

**त्रिवेणी**—मीं स्वतःच खून केला असतांना शंका कां वाटूं नये ?

**प्रयाग०**—मुली, तूं वेडांत किंवा स्वप्नांत कांहीं तरी बडबडत आहेस झालें !

**त्रिवेणी**—महाराज, मी वेडी नाहीं, किंवा मला स्वप्नहि पडत नाहीं. मी चांगली शुद्धीवर आहें. मीच आपल्या राजाचा निर्दयपणें घात करणारी चांडाळीण !

**विश्वेश्वर०**—लाडके, काय बोलतेस हें? गप्प रहा. जास्त बोलूं नकोस.

**त्रिवेणी**—माझ्या बोलण्यांत आतां कोणीहि व्यत्यय आणूं नका. माझ्या कृत्याचा आरोप एका निरपराधी व थोर गृहस्थावर विनाकारण येऊं पहात आहे, यामुळें केवळ नाइलाज ह्मणून ही कबुली मी देत आहें.

**प्रयाग०**—मुली, ही गोष्ट उघड उघड तूं आरोपीला वांचविण्याकरितां रचून सांगत आहेस. तूं खून केलास ह्मणतेस, तर त्याचा हेतु सांग पाहूं?

**त्रिवेणी**—एखाद्या हेवेखोर आणि खुनशी मुलीचा अशा कामीं जो हेतु असावयाचा, तोच माझाहि होता. गंगूताईस धुरंधरमहाराजांची प्राप्ति होऊं नये, हाच माझा उद्देश होता. असें होणें शक्य आहे कीं नाहीं, हें आपण तिलाच विचारा.

**वाराणशी**—( एकीकडे ) अग चांडाळणी! आजपर्यंत आह्मीं फुलांचा हार ह्मणून सर्पच गळ्याशीं बाळगला तर? आमचे उपकार खासे फेडलेस!

**त्रिवेणी**—माझ्या मैत्रिणीचे वल्लभ भार्गवराव यांच्याकडून मीं दुंदुभिपत्रांत जाहिरात प्रसिद्ध करविली. पण त्यांत यांचा बिलकुल संबंध नव्हता. धुरंधरमहाराज विहिरीपाशीं आल्यावर त्यांना सुरीनें भोंसकलें याच हातानें. माझ्यावर संशय येऊं नये ह्मणून पुढील व्यवस्था मात्र यांनीं भार्गवरावांच्या साहाय्यानें केली; आणि या खटल्याशीं माझ्या नांवाचा संबंध आला तर त्या नांवाला कलंक लागेल, ह्मणून अजूनहि हे माझ्या कृत्यावर पांघरूण घालीत आहेत. महाराज, आपणच विचार करा. ज्या पुरुषाचें मन इतकें कोमल, तो असें क्रूर कृत्य करील तरी का?

**धुरंधर**—( एकीकडे ) प्रिये त्रिवेणि, हद्द झाली तुझ्या प्रेमळपणाची! देवा, आयुष्यांत एकदांहि दृष्टीस पडणार नाहीं, असा उदात्त प्रसंग मला दाखविलास! आतां मरणाला माझी तयारी आहे. सगळ्या आयुष्याचें

सुख मला एका पळांत अनुभविण्यास सांपडलें! आतां जगून यापेक्षां अधिक सुख तें काय मिळणार?

**प्रयाग०**—(एकीकडे) हरहर! माझ्या मुलीच्या गुन्ह्याचा मी निवाडा करणार ना? ज्या माझ्या लाडकीला मीं तिच्या जन्मकालीं मात्र पाहिलें होतें, तिला पुन्हा पहाण्याचा प्रसंग मी तिला मृत्यूची शिक्षा सुनावितांना मात्र यावा ना! देवा, ज्या हतभाग्याकडून हिला जन्म मिळाला, त्याकडूनच हिला मृत्यु यावा ना! (उघड) मुली, मला काल तूं आरोपी निरपराधी असल्याबद्दल जें सांगितलेंस, त्याचा अर्थ तूं अपराधी आहेस, हाच होता का?

**त्रिवेणी**—होय महाराज!

**प्रयाग०**—मुली, तूं फार दुर्दैवी आहेस. ज्या तुझ्या वल्लभाला वांचविण्याकरितां तूं अशा प्रशंसनीय धैर्यानें पुढें आलीस, त्याचें तुझ्या कबुलीपासून कांहीं कल्याण होण्यासारखें नाहीं. कारण, त्यानें राजवधाचा गुन्हा छपविण्यास मदत केली असल्यामुळें त्याची शिक्षा चुकत नाहींच, उलट तूं कबुलीजबाब देऊन त्याच्या प्राणांबरोबर आपल्या प्राणांवरहि विनाकारण संकट ओढून आणलें आहेस!

**त्रिवेणी**—माझ्या प्राणांची मला पर्वा नाहीं. पण एक जीव नष्ट होऊन तो परत येण्याची आशा नसतांना त्याच्या मागोमाग दुसराहि जीव जाऊं नये ह्मणून केवळ परोपकारबुद्धीनें ज्यानें आपली शिकस्त केली, त्या महात्म्याला ही शिक्षा फारच मोठी आहे, असें नाहीं का आपणाला वाटत?

**प्रयाग०**—मुली, कडक असला तरी असा कायदा आहे. त्याचें उल्लंघन करण्याची मला शक्ति नाहीं.

**त्रिवेणी**—बरें तर. निदान माझ्या प्रियकराशीं शेवटचे दोन शब्द बोलण्याची तरी कायद्यानें मला मोकळीक ठेविली आहे का?

**प्रयाग०**—हें समाधान मला तुझ्यापासून हिरावून घेववत नाहीं. भेट आपल्या वल्लभाला.

**त्रिवेणी**—( धुरंधराजवळ जाऊन ) महाराज, आपणाबरोबर आयुष्य घालविण्याचें माझ्या नशीबीं नाहीं. पण त्या खालोखालचें आपणाबरोबर मरण्याचें भाग्य मात्र मला प्राप्त झालें आहे. महाराज, या जगांतील सुखाचा अनुभव आला तितका पुरे झाला. आतां आपण लवकरच स्वर्गांत आनंदानें एकत्र वास करूं.

**धुरंधर**—त्रिवेणि, निर्दोषीपणाचें प्रायश्चित्त भयंकर मरण, हें पाहून मला ईश्वराच्या न्यायीपणाबद्दल अविश्वास वाटूं लागला होता. परंतु तुझा माझ्यासारख्या क्षुद्र मनुष्यावरील दांडगा विश्वास पाहून माझा त्या सर्वसमर्थ ईश्वरावरील विश्वास, एक क्षणभर कां होईना, डळमळीत झाला, याबद्दल मला पराकाष्ठेची लाज वाटत आहे.

**त्रिवेणी**—महाराज, देव दयाळु आहे. त्यानें आपणांवर आणलेलें संकट आपल्या कसोटीकरितां आहे. त्या कसोटीला आपण उतरलें पाहिजे. ह्मणजे आपणांस चिरकालिक सुख प्राप्त होईल.

**सेवक** (प्रवेश करून)—महाराज, बाहेर आईसाहेब आल्या आहेत.

**प्रयाग०**—आईसाहेब? त्यांना याची वर्दी पोंचली कीं काय? त्यांचें सांत्वन आतां कोणत्या तोंडानें करूं?

**भार्गव**—( एकीकडे ) माझा जीव खालीं पडला. मी राणीसाहेबांना ताबडतोब निघून येण्याबद्दल पत्र लिहिलें, ह्मणून बरें झालें. नाहीं तर आज मोठाच प्रसंग गुदरावयाचा !

[ प्रयागपंडित सामोरा जातो. राणी प्रवेश करिते. ]

**राणी**—पार्थिवराज, तुमच्याकडून परवां जें पत्र आलें, त्याचा मला अर्थच कळेना. काल भार्गवाकडून ताबडतोब निघून येण्याबद्दल दुसरें पत्र आलें. त्याप्रमाणें, ही सारी भानगड काय आहे हें प्रत्यक्ष पहाण्याकरितां मी येथें आलें आहें. हा खटला कसला चालला आहे ?

**प्रयाग०**—आईसाहेब, आज आपणाला अत्यंत अप्रिय अशी वार्ता सांगण्याचा मजवर प्रसंग आला आहे. या दुर्दैवी पुरुषानें आज सर्व प्रजाजनांना शोकसमुद्रांत लोटिलें आहे.

**राणी**—कोण ? बाळासाहेब ?

**धुरंधर**—आईसाहेब, होय, मीच तो. ( दोघें भेटतात. )

**राणी**—तुमच्यावर आरोप ? आणि तो आणण्याचें धारिष्ट कोणाला झालें ?

**प्रयाग०**—राणीसाहेब, हे धुरंधरमहाराज नसून हा तो तोतया आहे.

**राणी**—पंडित, तोतया ह्मणजे कोणी खरीखुरी व्यक्ति नसून काल्पनिक आहे. त्याला आह्मींच आमच्या कल्पनेनें उभें केलें होतें. पण ज्याप्रमाणें पिशाच काल्पनिक असलें, तरी बाधा केल्यावांचून रहात नाहीं, त्याप्रमाणें या काल्पनिक तोतयानेंहि शेवटीं आपला हात आह्मांला दाखविलाच !

**प्रयाग०**—महाराज, मजकडून मोठा प्रमाद घडला. त्याची क्षमा तरी कोणत्या तोंडानें मागूं ?

**धुरंधर**—पंडित, यांत आपणाकडे किंवा दुसऱ्या कोणाकडे कांहीं दोष येत नाहीं. सर्व प्रकार केवळ गैरसमजुतीमुळें झाला. या संकटांतून माझी मुक्तता करण्याचें सारें श्रेय मात्र या भार्गवाकडेच आहे. असें असतांना मी नेणतेपणानें त्याजवर केवढ्या तरी भयंकर कृत्याचा आरोप केला! भार्गवा, मी तुझी क्षमा कशी मागूं ?

**भार्गव**—आपल्या संशयाचें निरसन झालें, यांत सारें कांहीं आलें.

**राणी**—बाळासाहेब,मी तुह्माला आधींच सांगत होतें,कीं तुह्मी वधू पसंत करायच्या भानगडींत स्वतः पडलां, तर तुह्मावर अवचित एकादें अरिष्ट यावयाचें. माझा तर्क अदमासापलीकडे खरा ठरला तर ?

**धुरंधर**—मी येथें आल्यापासून एकामागून एक अशा कांहीं चमत्कारिक गोष्टी घडून आल्या, कीं त्या सर्वांमुळें माझ्यावर माझ्याच खुनाचा आरोप येऊन तो मलाहि खरा वाटूं लागला होता. पण मला माझ्या साहसाचा पश्चात्ताप होण्याचें मात्र मुळींच कारण नाहीं. कारण, मी पसंत केलेली ही आपली सून इतकीं संकटें सोसूनहि प्राप्त करून घेण्या-

जोगी आहे, अशी तुमची खात्री होईल. प्रिये, आईसाहेबांच्या पायां पड. ( त्रिवेणी पायां पडते.) प्रिये, तूं अशी खिन्न कां ? एका गरीब मनुष्याला आपलें सर्वस्व अर्पण करून तूं जो स्वार्थत्याग करणार होतीस तो मीं नाहींसा केला, आणि शूद्रकन्येशीं विवाह करून स्वार्थत्याग दाखविण्याची मला संधि मिळून माझी सरशी होणार, ह्मणून कीं काय ?

**प्रयाग०**—महाराज, त्यांत आपलाहि स्वार्थत्याग नाहीं. कारण, ही माझी मुलगी आहे, हें त्या ताइतांतील कागदाच्या तुकड्यावरून स्पष्ट झालें आहे. कारण तो तुकडा मीं आपल्यापाशीं राखून ठेवलेल्या तुकड्याशीं तंतोतंत जुळतो. ( कागद दाखवितो. )

**धुरंधर**—तरीच हिच्या अंगीं असे अमोल सद्गुण वास करीत आहेत !

**त्रिवेणी**—बाबा, मी तुह्माला फार कठोर शब्द बोललें, याची क्षमा करा.

**प्रयाग०**—बाळे, ते शब्द यथायोग्य होते. हें सुख पहाण्याचें पुण्य माझ्या पदरीं असेल, असें मात्र मला वाटत नव्हतें.

**राणी**—पण आपला पार्थिव आणि भार्गव असे खिन्न कां ह्मणून ?

**पार्थिव**—आईसाहेब, मीं धुरंधराला न ओळखतां फार छळिलें. आतां नगरवास सोडून अरण्यांत राहण्याखेरीज मला गतिच उरली नाहीं.

**भार्गव**—आईसाहेब, त्रिवेणी ही माझी दूधबहीण. हिचा शोध करून धुरंधरमहाराजांशीं विवाह करून देण्याची माझी प्रतिज्ञा. पण मी तिच्या मार्गांत विघ्नें आणण्यास मात्र कारण झालों.

**यमुना**—आईसाहेब, मीं मनानें वरलेल्या पतीची मला जोड करून द्या.

**गंगू**—आईसाहेब, माझीहि आपल्या चरणांपाशीं अशीच विनंति आहे.

**राणी**—बाळासाहेब, तुह्मीच या कोड्याचा निकाल लावा. मला यांत कांहीं कळत नाहीं.

**धुरंधर**—पार्थिवा, तुझ्याकडून माझा जरी छळ झाला असला, तरी तो माझ्या काल्पनिक वधाबद्दल सूड उगविण्याच्या इच्छेनेंच झाला ना ? त्यांत तुला वैतागण्याचें कांहीं कारण नाहीं. मग सोडतोसना आपला हेका ?

**पार्थिव**—धुरंधरा, मी तुझ्या इच्छेच्या बाहेर नाहीं.

**धुरंधर**—तूं माझ्याकरितां आपला आग्रह सोडिलास, यानें मला फार समाधान झालें. (स्वत:शीं) पण हें दुसरें प्रकरण मात्र इतकें सोपें नाहीं. (उघड) भार्गवा, तूं मला आज प्राणदान दिलेंस, व या प्रकारें पर्यायानें तूं आपल्या बहिणीच्या सुखालाहि कारणीभूत झाला आहेस. शिवाय तूं तिच्या मार्गांत ज्या अडचणी आणल्यास, त्यांनींच मला तिच्या प्रेमाची कसोटी पाहण्याच्या कामीं मदत झाली ना? आतां तिच्या व माझ्या योगाला तुझें प्रत्यक्ष साहाय्य झालें नाहीं खरें; पण हें व्यंग दूर करण्याचा एक उपाय आहे.

**भार्गव**—तो कोणता?

**धुरंधर**—तुझें जरी त्याला साहाय्य झालें नाहीं, तरी यमुनेचें भरपूर झालें आहे. त्याचें अर्धें श्रेय तुला प्राप्त करून घ्यायचें असेल, तर तिला अर्धांगी करण्याला तुझी तयारी पाहिजे.

**भार्गव**—आपण सुचवितां, हा एकच मार्ग आहे खरा यांतून सुटण्याचा! मी आपली सूचना मान्य करतों.

**धुरंधर**—हे मजवर तुझे मोठे उपकार आहेत.

**श्रीपति**—म्हाराज, मालकांच्या लग्नासंग आमचंबी लगीन जालं, तर लई खुशी पैदा व्हईल.

**धुरंधर**—(हंसून) एकनिष्ठ सेवकांचा संतोष तोच आमचाहि संतोष!

**भार्गव**—ताई, माझ्या दुर्दैवानें या साऱ्या नाटकांत मला तुझ्याशीं प्रतिकूल होण्याची जरी बुद्धि झाली, तरी तुजविषयींच्या माझ्या निर्मल प्रेमाकडे दृष्टि देऊन तूं मला क्षमा करशील ना?

**त्रिवेणी**—दादा, माझें पुढील वर्तनच तें आपोआप सिद्ध करून दाखवील.

**वाराणशी**—महाराज, त्रिवेणी कांहीं झालें तरी मला माझ्या गंगू-सारखीच आहे. तिचें कल्याण झालें, यांत मलाहि आनंदच आहे.

आपल्या आग्रहानें पार्थिवराजांनीं आपला अरण्यवासाचा हेका सोडला, हेहि आपले आमच्यावर मोठे उपकार झाले. पण गंगूबद्दल आपण जें भाकित केलें होतें, तें अजून पुरें झालें नाहीं. ही गोष्ट आपल्यासारख्या सत्यव्रत राजांना सलल्यावांचून रहात नसेल.

धुरंधर—राजयोगाबद्दलचेंच भाकित ना? तें माझ्या पूर्णपणें लक्षांत असून, तुमची सूचना होण्यापूर्वींच मीं त्याच्याविषयीं एक योजनाहि केली आहे. माझ्या राज्यापैकीं एक मोठा प्रांत स्वतंत्रपणें पार्थिवाल तोडून दिला जाईल. या योजनेला सार्वभौम सरकारची अनुमति मागण्या-साठीं मी ताबडतोब खलिता रवाना करतों.

वाराणशी—देव आपणाला उदंड आयुष्य देवो! आपणाला राज ज्योतिषी ह्मणावें, कीं ज्योतिषिराज ह्मणावें, हेंच कळत नाहीं.

धुरंधर—पार्थिवा, भार्गवा, आपणांपैकीं प्रत्येकाचे हेतु त्या जग न्नियंत्याच्या इच्छेनें पूर्ण झाले आहेत!

राणी—तुमचे संकल्प दृढ करण्याला विवाहबंधनाचीच काय आवश्यकता आहे. तुमची हरकत नसेल, तर पहिल्याच मुहूर्तावर तुह सर्वांना चतुर्भुज करून टाकूं. आणि खरोखर या संसारांत अनुरू वधू मिळून तिच्या पाशांत बद्ध होऊन राहण्यांत जितकें सुख आं त्याच्या शतांशहि सुख स्वतंत्र रहाण्यांत नाहीं, याचा तुह्मांला स्वा भवानें प्रत्यय येवो, येवढेंच माझें ईश्वरापाशीं मागणें आहे.

सर्व—तथास्तु!

[ पडदा पडतो. ]

